: प्रकाशक :
कृष्णाजी नारायण सापळे,
रामकृष्ण प्रकाशन मंडळ,
रुक्मिणी–निवास, मोरबाग रोड, मुंबई १४

प्रथमावृत्ति जून १९५२

---





लेखक : **सत्यवान नामदेव सूर्यवंशी,**
१।१४, हिरजी गोविंदजी बिल्डिंग, २ रा माळा,
नवा नागपाडा : मुंबई ८

**किंमत १॥ रु.**

: मुद्रक :
**कृष्णाजी नारायण सापळे,**
रामकृष्ण प्रिंटिंग प्रेस,
मोरबाग रोड, दादर, मुंबई १४

# प्रस्तावना

श्री. **सत्यवान नामदेव सूर्यवंशी** हें आतां ओळख करून देण्याइतके नवखे नाटककार राहिलेले नाहींत. महाराष्ट्रांत, विशेषतः मुंबईत जे कांहीं नवोदित नाटककार नाट्यरसिकांचे अत्यंत आवडते झालेले आहेत, त्यांत श्री. सूर्यवंशी यांची प्रामुख्यानें गणना होते. असें असतांनाहि त्यांनीं ह्या नाटकाला मीं प्रस्तावना लिहावी अशी इच्छा प्रदर्शित केली, ती केवळ मला मान देण्यासाठींच असावी असें मला वाटतें. श्री. सूर्यवंशी यांच्यासारख्या अनुभवी व कलावंत नाटककाराच्या नाटकाला प्रस्तावना लिहिण्याचें मीं कबूल केलें तेंहि त्याच समजुतीनें. म्हणजे माझ्या प्रस्तावनेमुळें श्री. सूर्यवंशींना मोठेपणा मिळणार नसून, त्यांच्या नाटकाला प्रस्तावना लिहिण्याचा सुयोग मिळाल्यामुळें उलट मलाच त्यांनीं मोठेपणा दिलेला आहे ! आणि म्हणूनच पुढील चार ओळी लिहितांना मला आनंद होत आहे.

जीवनांतील भल्याबुऱ्या घटनांची कलात्मक प्रतिकृति म्हणजे नाटक, अशी जरी सर्वसाधारणपणें नाटकाची व्याख्या मानली, तरीहि जीवनांतील प्रत्येक घटना कांहीं नाट्यविषय होऊं शकत नाहीं. ज्या घटनांत नाट्य नसेल, त्या घटना प्रत्यक्ष जीवनांत कितीहि महत्त्वाच्या असल्या, तरी रंगभूमीवर त्यांना स्थान नसतें. फक्त नाट्यमय घटना असलेलें जीवन रंगभूमीवर रंगतें, आणि तेंच जीवन प्रेक्षकांच्या अंतःकरणांत घर करून राहतें; चिरंजीव होतें ! '**ठांसून झालं पाहिजे**' ह्या नाटकांतील घटना अशीच नाट्यमय आहे. नाट्यमय घटना निवडण्यांत नाटककारानें जेवढें कौशल्य दाखविलें आहे, त्यापेक्षांहि अधिक कौशल्य त्यानें कथावस्तूचा आविष्कार करण्यांत दाखविलेलें आहे. नेहमींच हातावर तुरी देण्याची संवय असलेल्या आपल्या लेखनवेड्या नवऱ्याला—चंद्रकांताला चंद्रिका तुरीची डाळ आणायला सांगते, पण खिशांत दमडी नसलेला चंद्रकांत आपल्याच स्वप्नाळू विचारतरंगांत धुंद आणि तल्लीन झालेला असतो. त्यावेळीं त्यांच्यामध्यें झडलेले संवाद आणि तें सबंध दृश्य म्हणजे एक सत्यकथाच असल्याचा भास होतो ! आणि याचें कारण एकच कीं, त्या घटनेंत अनुभवजन्य जिव्हाळा नि जिवंतपणा ओतप्रोत भरलेला आहे ! ह्या नाटकांतील कथानक, कथापरिणोष, भिन्न भिन्न स्वभाव असलेलीं आणि वास्तवतेशीं प्रामाणिक असलेलीं पात्रें, सोपे साधे आणि अर्थपूर्ण खटकेबाज संवाद इत्यादि गूण पाहिले, कीं नाटक म्हणजे जीवनावरची विधायक आणि विदारक टीका आहे असें म्हणतात, तें चटकन् पटूं लागतें. नाटकांतील पात्रें विद्वान नाहींत हें खरें; पण त्यांच्या वृत्तींतून

निर्माण झालेलें गूढ तत्त्वज्ञान विद्वानांनाहि विचार करायला लावील, असें सामर्थ्यशाली आहे. तुरीची डाळ आणायची आज्ञा करणाऱ्या शुद्ध व्यवहारी पत्नीपुढें विचाऱ्या तत्त्वज्ञानी साहित्यिक नवऱ्याची डाळ शिजत नाहीं, हें दाखविण्यांत नाटककाराचें चातुर्यच दिसून येतें.

आजच्या लोकशाही युगांत अशीच युगस्वरुपदर्शक नवीन नवीन नाटकें लिहिलीं गेलीं आणि तीं कलावंत नटनटींकडून रंगभूमीवर आलीं, तर 'मराठी रंगभूमी मेली हो!' अशी रडारड करण्याची पाळी खात्रीनें येणार नाहीं! लोकशाही चिरंजीव होण्यासाठीं नि ती खऱ्या अर्थानें लोकशाही होण्यासाठीं जें लोकमत तयार व्हावें लागतें, त्यासाठीं नाटकांची अत्यंत आवश्यकता आहे. नाटक हें लोकशाहीला जिवंत ठेवणारें अमृत आहे. आणि म्हणूनच 'The Federal Theatre' मध्ये Haywood Broun नें म्हटलेलें आहे कीं. It is just as important to prove that democracy can foster good plays and short stories and mural paintings as to prove our ability to build airplanes.' यापुढे केवळ करमणुकीचें साधन म्हणून नाट्यकलेकडे न पाहातां, राष्ट्राच्या अभिवृद्धीसाठीं व प्रगतीसाठींहि नाट्यकलेला राबवून घेण्याचा विडा प्रत्येक नाटकारानें उचलला पाहिजे. श्री. सूर्यवंशी हे अशा राष्ट्रीय आघाडीवरील एक झुंझार नाटककार आहेत, ही अत्यंत समाधानाची गोष्ट होय. 'टांसून झालं पाहिजे' हें नाटक वाचनीय आणि प्रेक्षणीय अशा दोन्हीं गुणांनीं भरगच्च भरलेलें असल्यामुळें, माझी खात्री आहे कीं, मराठी नाट्यरसिक श्री. सूर्यवंशी यांचें मनःपूर्वक अभिनंदन करून त्यांना आपल्या सहस्र मुखांनीं सांगतील कीं, यापुढेंहि 'टांसून झालं पाहिजे!'

नाटककार श्री. सूर्यवंशी यांच्या 'टांसून झालं पाहिजे' ह्या ललित ललकारींत इतरांप्रमाणेंच मी माझाहि सूर मिसळतों आणि यापुढेंहि त्यांच्या लेखणींतून अशींच नाट्यरत्नें निर्माण होवोत अशी सदिच्छा व्यक्त करून, प्रस्तावनेदाखल लिहिलेल्या ह्या चार ओळी पुऱ्या करतों. कारण, Play is the thing to look at, not the preface!

मुंबई नं. ४.
ता. १९–६–५२

कॅप्टन **मा. कृ. शिंदे**



मित्रवर्य श्री. **मुरारी शिवलकर** आणि सौ. **प्रभाताईस**

आमच्या परस्पर जिव्हाळयासाठीं...

तसेंच—

**कु. नीरा सावंत**

हीस

माझी 'चंद्रिका' श्रम घेऊन

साकार केली म्हणून

सप्रेम भेट

२३ जून १९५२

—**सत्यवान नामदेव सूर्यवंशी**



श्री. नरेश प्रजापति



श्री. वसंत भोवर



कु. नीरा सावंत



श्री. वसंत दुद्वडकर



मास्टर जनार्दन



श्री. मुरली मयेकर



सौ. मनोरमा सॉल



श्री. विष्णु बोले



श्री. विनायक मनोहर साठे



श्री. श्रीधर पवार

# नांदीपूर्वी !

सहा महिन्यांपूर्वी ' लाल राज्य ' नाटकाचा प्रयोग आमच्या ' सहकार नाट्य-कला केन्द्रा 'नें केला आणि प्रेक्षकांना तो खूप खूप आवडला. प्रयोग करून झाल्यावर त्या प्रयोगाचे दिग्दर्शक, माझे मित्र श्री. वसंत भोवर माझा निरोप घेत म्हणाले, ' मास्तर, [ माझे निकटवर्ती नाट्य व्यवसायी मला ' मास्तर ' म्हणतात ] आतां एखादं नवं नाटक लिहा आणि तें असं लिहा, कीं त्यांत हास्य आणि कारुण्य ह्यांचा विलक्षण मिलाफ असेल-' मी त्यांना ' हो ' म्हणालों आणि कांहीं महिने तो बेत विसरून गेलों.

' लाल राज्य ' नाटक प्रयोगदृष्ट्या कितीही चांगलें झालें असलें; तरी प्राप्तीच्या दृष्टीनें आम्हांला तें अंगाशीं आलें. हौशी मंडळांची नाटकं उधार तिकिटांनीं बघून पैसे बुडवणारा प्रेक्षकवर्ग आम्हांलाही भेटला आणि घरांत चणचण सुरू होऊन पत्नीशीं माझे खटके उडूं लागले. कांहीं दिवस अशी परिस्थिती झाली कीं आम्ही अक्षरशः ' दोन पैशांच्या तुरीच्या डाळीला महाग ' झालों ! कलाकार दरिद्री असला तरी त्याला भूक लागते, नुसती कलाच निर्माण करून त्या निर्मितीच्या आनंदांत त्याला जगतां येत नाहीं, हें माझ्या फुकट्या प्रेक्षकांना, चहात्यांना आणि देशबांधवांना ओरडून सांगावें असें मला जोरानें वाटूं लागलें. प्रथम मी लेख लिहायचें ठरवलें. पण लेख रुक्ष वाटून त्यांना कुणी वाचणार नाहीं असें समजून तो बेत रद्द केला. नंतर एक कादंबरी लिहावी असें ठरवलें. तिचीं एक दोन प्रकरणें लिहून तीं फाडून टाकलीं. नाटकं करून रंगभूमीवर आणणारा लेखक एक व्यसनी प्राणी असतो. ज्या नाटकाच्या वेडामुळें घरांत आम्ही तुरीच्या डाळीला महाग झालों, त्याच नाटकाचें माध्यम घेऊन पुन्हां एकदां आगींत उडी घेऊन आपलें गार्‍हाणें वेशीवर टांगण्याचा मी निश्चय केला आणि ह्या नाटकांतील ' चंद्रकांत ' ' चंद्रिके 'चे सुरुवातीचे संवाद मी एके रविवारीं लिहीत बसलों.

मी तो प्रवेश लिहीत असतां नाटककार श्री. मुरारी शिवलकर नेहमींप्रमाणें फिरत फिरत तेथें आले. त्यांनीं सहज ते खरडलेले कागद वाचून पाहिले आणि त्यांना ते फार आवडले. त्यांनीं नाटक पुरें करण्याची मला आग्रहानें गळ घातली.

“ चंद्रकांत ’चें काम आपण स्वतःच करणार असेंही त्यांनीं सांगून टाकलें. त्या दिवशीं तो लिहिलेला प्रवेश घेऊन ते घरीं गेले.

त्यानंतर अंक पुरा करून मी तो दुसरे दिवशीं शिवलकरांचे घरीं घेऊन गेलों तेव्हां प्रभाताईनीं स्वागत करून म्हटलें, ‘ या भाऊ, मित्रानें सांगितलेल्या सान्या गोष्टी खऱ्या मानून तुम्ही आमच्यावर नाटक लिहीत आहां; पण प्रथम माझी बाजू ऐकून घेऊन मग लिहायचं तें लिहा.’ मी चकित होऊन प्रभाताईना म्हणालों, ‘ तुमची गोष्ट मीं नाटकांत घातली नाहीं ताई ! माझी न् मीराची गोष्ट आहे ही ! ’ पण त्यावर ताई म्हणाल्या, ‘ मी फसायची नाहीं अं भाऊ ! त्या सोन्याच्या बांगड्या, गळ्यांतली चेन आणि कानांतलीं कर्णफुलं ...अगदीं आमची हकीगत आहे ही सारी ! ’

नाटकाचें लेखन सात आठ दिवसांत पुरें करून त्याची हस्तलिखित चोपडी तंत्रदृष्टया कॅप्टन मा. कृ. शिंदे ह्यांनीं तपासून बघावी म्हणून मीं त्यांच्या घरीं नेऊन टाकली. दोन तीन दिवसांनीं मी त्यांना भेटायला गेलों तेव्हां डोळयांत अक्षरशः पाणी आणून कॅप्टन शिंदे म्हणाले, ‘ सूर्यवंशी ! तुम्हीं ही माझी हकीगत लिहिली आहे. ह्या पुस्तकांतले कांहीं संवाद देखील आमच्या घरांत आम्ही वेळोवेळीं बोललों आहोंत ! ’

माझ्या हृदयांतील मुक्या कडांना वाचा फोडतां फोडतां नाट्य सृष्टींत पोळलेल्या लोकांच्या जीवनाची करुण कथा अशा रीतीनें अनाहूतपणें माझ्या हातून लिहून गेली हें बघतांच माझा आनंद, माझा हुरूप द्विगुणित झाला. खिशांत दमडा नसतां, हें नाटक रंगभूमीवर आणायचें असा निश्चय पक्का करून मी प्रयोगाच्या तयारीस लागलों. ‘ पैसे कुठून येणार ? ’ असा प्रश्न सौभाग्यवतीनें नेहमीप्रमाणें विचारलाच. त्यावर मी म्हणालों, ‘ माहीत नाहीं...येतील ! ’

नाटकाच्या उद्‌घाटनाचा [ तालमीच्या मुहूर्ताचा ] खर्च श्री. शिवलकरांनीं केला. नट्यांचे ‘अॅडव्हान्स’ माझे दुसरे नाटककार मित्र श्री. म. तु. मोरे ह्यांनीं भरले. प्रत्यक्ष तालमींचा खर्चही कधीं शिवलकर तर कधीं दुसऱ्याच कुणी तरी केला. हें इतकें सांगायचें कारण असें कीं, हौशी नाटकवाल्यांची आजची स्थिति त्यांच्या चहात्यांना समजून यावी.

ह्या नाटकांत कामें करणारे कलाकार, म्हणजे श्री. मुरारी शिवलकर, नाटककार श्री. वसंत दुदवडकर, मास्टर जनार्दन, श्री. विष्णु बोले, पार्श्वसूचक

श्री. मुरली मयेकर, श्री. गणपत सूर्यवंशी, लिंबा मोरे, दगडू सोनावणे, हरीबा पंडित, आणि श्री. गंगाराम सूर्यवंशी ह्यांनीं प्रथमपासून हुरूप दिला—आपलेपणानें तालमी दिल्या—श्रम घेतले. श्री. वसंत भोवर ह्यांनीं श्रम घेऊन अभिनय शिकवला आणि माझी कल्पना साकार केली. श्री. नरेश प्रजापती, ह्यांनी सुंदर चाली दिल्या. कु. नीरा सावंत आणि सोफी नागांवकर ह्यांनीं आतांपर्यंत कुठल्याही नाटकाला दिल्या नव्हत्या इतक्या अधिक तालमी देऊन हें नाटक यशस्वी बसवण्यांत मदत केली. त्यांचे आभार मानणें मी माझें कर्तव्य समजतों.

रामकृष्ण प्रकाशन मंडळाचे चालक आणि मालक श्री. कृ. ना. सापळे हे गृहस्थही बरेच हौशी आणि गुणग्राहक दिसले. त्यांनी हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचें मनावर घेऊन अगदीं अल्प काळांत पण सुबक स्वरूपांत तें छापून वेळेवर प्रसिद्ध केलें व मला उपकृत करून ठेवलें आहे.

स्वत: जळत असतां हौशी कलाकार आज तेज देण्याचे आणि रंगभूमीची जागती ज्योत तेवत ठेवण्याचे प्रयत्न करीत आहेत—ही त्यांची पेटती आग कशी दाहक आहे तें ह्या नाटकांतून सत्य स्वरूपांत मांडण्याचा प्रयत्न मीं केला आहे. ही ज्योत सर्वांना आवडो. हा प्रकाश सर्वांना अस्वस्थ करून सोडो. रंगभूमिच्या सेवकांना कर्तव्यनिष्ठेचा मंत्र ह्यांत दिसो. तिच्या चाहत्यांना कलाकारांचा मार्ग मोकळा करण्याची प्रेरणा मिळो!

बस! इतकी प्रस्तावना करून मी हें नाटक आपणास पडदा बाजूला करून आतां दाखवतों आणि म्हणतों,—टांसून झालं पाहिजे!

**—सत्यवान नामदेव सूर्यवंशी**

*

*

**'ठांसून झालं पाहिजे !'** ह्या नाटकाचा पहिला प्रयोग मुंबईस परेल-मधील **दामोदर ठाकरसी हॉलच्या** रंगभूमीवर **सोमवार दिनांक २३ जून १९५२** रोजीं **'सहकार नाट्यकला केन्द्र'** ह्या संस्थेनें करून दाखवला.

स्थापना ] **सहकार नाट्यकला केन्द्र, मुंबई** [ १९५०

संस्थापक : **कु. उमा भगवंत** ● **श्री. स. ना. सूर्यवंशी**

: दिग्दर्शक : : नृत्यशिक्षक : : संगीत :

**वसंत भोंवर** ◆ सौ. **मनोरमा सॉल** ◆ **नरेश प्रजापति**

वाद्यमेळा : **हार्मोनियम** : नरेश प्रजापति; **तबला** : दादा नाईक
**व्हायोलीन** : डिसोझा, म्हात्रे; **फ्लूट** : रामचंद्र नवल्ह;
**ट्रंपेट** : बाळ महाडीक; **चौंडकें** : रामकृष्ण साळगांवकर;
**ढोलकें** : किसन; **स्वर-सहायक** : काशीनाथ जाधव.

पार्श्वसूचक : **मुरली मयेकर** ● **शिवकुमार जोशी**

सेक्रेटरी : **म. तु. मोरे** ◆ मॅनेजर : **रमाकांत मयेकर**

: प्रमुख भूमिका :

| | | |
|---|---|---|
| चंद्रकांत | ... ... | **नाटककार मुरारी शिवलकर** |
| चंद्रिका | ... ... | **कु. नीरा सावंत** |
| मुरली | ... ... | **नाटककार वसंत दुदवडकर** |
| प्रकाश | ... ... | **श्री. विष्णु बोले** |
| सुभान्या | ... ... | **मास्टर जनार्दन** |
| तात्या | ... ... | **श्री. वसंत भोवर** |
| भिंगरी | ... ... | **सोफी नागांवकर** |

: रंगभूषा : : पब्लीसिटी आर्टिस्ट :

**श्रीधर पवार** ◆ **विनायक मनोहर साठे**

तमासगीरः—ढोलकीवाला **लिंबा मोरे,** हालगीवाला : **दगडू**

नाच्या : **गणपत,** तुणतुणें : **हरीबा पंडीत,** झांज : **गंगाराम सूर्यवंशी** वगैरे

# ठांसून झालं पाहिजे !

अंक १ ला  दृश्य १ लें

[ मुंबईतील गिरणगांवांतील एका हौशी नाटककाराचें घर. समोर मधोमध बाहेरून आंत येण्याचें दार. डाव्या बाजूला सैंपाकघराच्या खुराड्याकडे जाण्याचा दरवाजा. उजव्या बाजूच्या कोपऱ्यांत एक लहानसें टेबल. त्यावर अव्यवस्थित पडलेलीं पुस्तकें. खोलीत एक आराम खुर्ची. ह्या खुर्चीवर पाय ताणून लेखक पडले असून कुठल्या तरी साप्ताहिकांत त्यांनीं तोंड खुपसलें आहे. आंतून त्यांची अर्धांगी येते. लेखक आहेत चंद्रकांत आणि त्यांची अर्धांगी चंद्रिका. ]

**चंद्रिका** : ऐकलं कां ?–[ नाही ! तो मख्खपणें होता तसा बसला आहे ] अहो, मी काय म्हणतें तें ऐकलं की नाही. उठा आतां. ठेवा बाजूला तो पेपर.

**चंद्रकांत** : [ नाइलाजानं पेपर बाजूला करून ]–हं, हें घे. ठेवला पेपर बाजूला. काय आहे ?

**चंद्रिका** : बाहेर जाऊन दोन पैशांची तुरीची डाळ घेऊन या—

**चंद्रकांत** : मी लेखक आहे, माहीत आहे ?

**चंद्रिका** : हो तर— !

**चंद्रकांत** : नाटककार आहे, माहीत आहे ?

**चंद्रिका** : हो तर— !

**चंद्रकांत** : एक उत्कृष्ट नट आहे, माहीत आहे ?...बोल, माहीत आहे ?

**चंद्रिका** : माहीत आहे !

**चंद्रकांत** : आणि इतकं सगळं माहीत असून मला दोन पैशांची तुरीची डाळ आणायला सांगतेस ? काय अरसिक बायको आहेस ग तूं !

**चंद्रिका** : बोलण्यांत वेळ घालवूं नका. उठा, तुरीची डाळ घेऊन या.

**चंद्रकांत** : जाणार नाहीं–अपमान आहे माझा हा !

**चंद्रिका** : ह्यांत काय अपमान आहे ?

**चंद्रकांत** : अपमान काय आहे ? एवढा मोठा मी लेखक, छप्पन पुस्तकांचा कर्ता, नाटककार, कवि–आणि तूं खुशाल मला तुरीची डाळ आणायला सांगतेस ? लोक माझा उपहास करतात. लेखक म्हणून जो तो माझी उपेक्षा करतो. घरांतील माणसं मला मूर्खांत काढतात. मी अगदीं कामांतून गेलों आहे असं समजतात. आणि...आणि आतां तूंही त्यांना सामील झाली आहेस होय ? खुशाल मला तुरीची डाळ आणा म्हणून सांगतेस !

**चंद्रिका** : एवढीशी तुरीची डाळ लेखकानं आणली म्हणून काय झालं ? उठा, घेऊन या तुरीची डाळ !

**चंद्रकांत** : ऐक चंद्रिका—तूं माझी अर्धांगी ! माझी बायको तूं ! लोकांनी माझी उपेक्षा केली तर तें मी एक वेळ सहन करीन. पण तूं माझी धर्मपत्नी ! तूं तरी माझी उपेक्षा करूं नयेस अशी इच्छा मी केली तर चूक होईल का माझी ती ?

**चंद्रिका** : छे ! मुळींच नाहीं ?

**चंद्रकांत** : तुला माहीत आहे, लेखक जन्मावा लागतो !

**चंद्रिका** : जन्मावा लागतो !

**चंद्रकांत** : मी एक प्रतिभासंपन्न, द्रष्टा लेखक आहे, हें मान्य करतेस ?

**चंद्रिका** : मान्य करतें !

**चंद्रकांत** : लिखाणाची किमया, लेखणीची जादु, भाग्यवान माणसाला महद्-भाग्यानं लाभलेली असते, हें मान्य करतेस ?

**चंद्रिका** : मान्य करतें !

**चंद्रकांत** : लेखक कोण आहे ? लेखक काय आहे ?–नुसती तोंड वासून बघत राहूं नकोस; लेखक कसा आहे तें मी तुला ह्या क्षणीं सांगतोंय्. नीट ऐकून घे–लेखक हा सामर्थ्याचा पुतळा आहे ! लेखक हा क्रांतीचा अग्रदूत आहे. लेखक नव्या जगाचा प्रणेता आहे. जीवनाचा प्राण आहे ! मान्य आहे तुला हें सारं ?

**चंद्रिका** : हो !

**चंद्रकांत** : त्याची लेखणी तरवारीपेक्षां तीक्ष्ण, विजेहून प्रचंड, सागराहून विशाल सामर्थ्याची जननी असते. बोल, चंद्रिके, बोल ! मान्य आहे तुला हें ?

**चंद्रिका** : हो !

**चंद्रकांत** : लघुकथा, कादंबरी, निबंध, प्रबंध, नाटकं, त्रोटकं, वृत्तपत्रीय लिखाण, काव्य ह्या साऱ्या वाङ्मय प्रकाराचं लिखाण करणारा मी एक प्रतिभा-संपन्न द्रष्टा लेखक आहे, हें तुला माहीत आहे ?

**चंद्रिका** : अगदीं चांगलं !

**चंद्रकांत** : मग ?

**चंद्रिका** : मग काय, दोन पैशांची तुरीची डाळ आणा जाऊन लौकर–मला उशीर होतोय् !

**चंद्रकांत** : मी जाणार नाहीं ! माझा हा अपमान आहे !

**चंद्रिका** : उठा—

**चंद्रकांत** : चंद्रिके—!

**चंद्रिका** : उठा ना, असं काय ? माझीं कामं खोळंबून राहिलीं आहेत. उठा !

**चंद्रकांत** : मी उठणार नाहीं.

**चंद्रिका** : उठा लौकर म्हणतें ना—

**चंद्रकांत** : मी जागचा हलणार नाहीं—ह्या वेळीं मी एक महत्त्वाची कल्पना मनाशीं जुळवीत आहे. त्रास देऊं नको मला.

**चंद्रिका** : कसली कल्पना जुळवताहांत ?

**चंद्रकांत** : नव्या नाटकाची माझ्या.

**चंद्रिका** : पुन्हां नाटक ? कमाल झाली आतां तुमच्या ह्या नाटकांपुढं ! जरा संसाराचं नाटक बघा ना आधीं नीट ! घरांत धान्याचा कण नाहीं. कोळसे संपले. तेल संपलं. साखर नाहीं...

**चंद्रकांत** : हें पाहा, उगीच कटकट नको लावूंस माझ्या पाठीशी तूं ! जा पाहूं इथून–शांतपणें माणसाला विचार करूं दे जरा.

**चंद्रिका** : तुरीची डाळ घेऊन या नि शांतपणें विचार करीत बसा !–हं उठा, उठा ना—

**चंद्रकांत** : असं काय बरं चंद्रिके !–हें बघ, ऐक; तुला झकासपैकीं मोहनमाळ हवी ना—?

**चंद्रिका** : थापा पुरे झाल्या; प्रथम तुरीची डाळ आणा दोन पैशांची ! मोहनमाळ रोज येतच आहे !

**चंद्रकांत** : छे, छे, छे ! तूं ह्या वेळीं बघ; मोहनमाळ नक्कीच येणार तुला ! काय मस्त कल्पना सुचली आहे म्हणतेस ! नाटक पण नाटक होईल हें ! नुसतं नांव ऐकून प्रेक्षकांच्या उड्या पडणार त्याच्यावर ! हौस फुल्ल झालंच पाहिजे. अग, कॅन्वासिंगची देखील गरज पडणार नाहीं ! नांव माहीत आहे काय देणार तें ? –ओळख, तूंच ओळख पाहूं ?

**चंद्रिका** : मला त्यांत कांहीं समजत नाहीं !

**चंद्रकांत** : ' ठांसून झालं पाहिजे ! ' काय ? –कसं आहे नांव ?

**चंद्रिका** : इश्श !

**चंद्रकांत** : इश्श काय ? छक्क नांव आहे हें ! संगीत ' ठासून झालं पाहिजे ! ' –अग लाजतेस काय अशी ? खास तुझी न् माझी गोष्ट घालणार आहें मी नाटकांत !

**चंद्रिका** : छे बाई !—

**चंद्रकांत** : [ तिला जवळ ओढून ] अगदींच ही कशी ग तूं ?

**चंद्रिका** : ही म्हणजे !

**चंद्रकांत** : लेखकाची–माझ्यासारख्या नाट्यलेखकाची बायको हवी कशी ?... माझ्या मधुर कल्पनाशीं तन्मय होणारी; माझ्या कल्पनेंत भर टाकणारी; माझ्या निर्मितीचा रसास्वाद चाखणारी !

**चंद्रिका** : आणि मी तशी नाहीं ?

**चंद्रकांत** : झालं ! उठलीस पुन्हां फिस्कारून मांजरीसारखी ! काय झालं एवढं फणकाऱ्यानं बोलायला तुला ग ? एवढंसं नाक नाहीं, पण राग केवढा येतो त्याला एवढ्या तेवढ्यावरून !

**चंद्रिका** : माझं नाक दिसणारच वाईट तुम्हांला !

**चंद्रकांत** : म्हणजे काय ?

**चंद्रिका** : म्हणजे मी आतां तुम्हांला कुरूप दिसेन, बेढब वाटेन. काय वाटेल तीं नांवें ठेवणारच तुम्ही मला आतां !

**चंद्रकांत** : डोकं फिरलंय कीं काय तुझं ?

**चंद्रिका** : डोकं फिरलंय तुमचं. माझं नाहीं ! रात्रंदिवस तें मेलं नाटक नाटक न् नटी नटी ! तिच्यापुढं मी कुरूप दिसणारच तुम्हांला !

**चंद्रकांत** : आतां मात्र तुला हात जोडले ! नटीचा संशय घेतेस ? वाटायला पाहिजे तुला कांहीं तरी !

**चंद्रिका** : मी म्हणतें तुम्हांला वाटायला पाहिजे कांहीं तरी ! मी चांगली लग्नाची बायको घरांत असतां खुशाल त्या गांवभवान्यांना गोळा करून रात्र रात्र धुडगूस घालतां ! कशी लोखंडासारखी प्रकृति होती तुमची. आतां अगदीं चोपून चिपाडासारखं अंग झालं आहे ! तरी त्या सटव्यांचा नाद सुटत नाहीं ना तुम्हांला ?

**चंद्रकांत** : चंद्रिके ! हा माझ्या कलेचा अपमान आहे ! वृथा आरोप करून तूं माझ्यावर अन्याय करीत आहेस ! तुझा केंसानं गळा कापून नटींच्या संगतींत रंग ढंग करीत बसण्याइतका मी नादान नाहीं. नाटकांत काम करणारी नटी तूं समजतेस तशी शीलहीन नसते. तीहि कुलीन असते. केवळ कलेच्या प्रेमाखातर ती तोंडाला रंग फांसून रंगभूमीवर उतरत असते !

**चंद्रिका** : कशाला मोठाल्या गप्पा मारतां माझ्याजवळ, चंद्रकांत ! कलेच्या प्रेमाखातर नटी रंगभूमीवर काम करीत असती, तर पन्नास रुपये नाईट तिनं हक्कानं आणि हट्टानं कां मागीतली असती ? रिहर्सलच्या वेळीं ती मुद्दाम गैरहजर कां राहिली असती ? ॲडव्हान्स मिळाळाच पाहिजे असा हट्ट तिनें कां धरला असतां ?

**चंद्रकांत** : नाट्यकारांची दुनिया तुला बरीच समजूं लागली म्हणायची ! पण हे आरोप नटीवर करण्याआधीं तूं त्यांची बाजू समजून कां घेत नाहीस ? नाटकामुळं निर्मात्याला नफा होण्याची शक्यता असते, दिग्दर्शकांना मोबदला मिळण्याची शक्यता असते. नाटक रंगवणारा रंगभूपाकार पैसे घेतो. संगीतवाला पैसे घेतो ! लेखक पैसे घेतो—

**चंद्रिका** : म्हणे लेखक पैसे घेतो ! एक छदाम तरी आणला आहे का घरांत तुमच्या चार नाटकांनीं ! उलट माझ्या हातांत दोन बांगड्या होत्या त्या गेल्या. कानांतलीं कर्णफुलं गहाण पडलीं. गळ्यांतली चेन गेली. आणि डोक्यावर कर्जाचा डोंगर चढला !

**चंद्रकांत** : जातिवंत नाटककाराची बायको होण्यापेक्षां तूं एखाद्या लोखंडघाशाची बायको व्हायला हवं होतंस चंद्रे ! माझीं तीं चार नाटकं ! भाषेच्या, कल्पनेच्या, ध्येयाच्या दृष्टीनं कमी आहेत ? त्यांचं सर्वांनी केवढं कौतुक केलं ! 'वेणी' 'धनुर्धारी' 'शिलेदार' 'शृंगार' 'बिजली' ह्यांनी त्यांवर स्तुतींनीं भरळेले रकानेच्या रकाने खरडले ! बिजलीनं तर माझी दोन पानं खास मुलाखत छापली ! आणि त्या नाटकांना तूं नांवं ठेवतेस ? अरसिक बायको !

**चंद्रिका** : मी आतां अरसिकच वाटणार हो तुम्हांला ! नटी नाहीं ना मी ! बायको आहे नुसती !

**चंद्रकांत** : हें बघ चंद्रिके, तुला मी एकदांच नीट बजावून ठेवतों, तूं मला काय हवं तें बोल; पण नटीचं नांव घेऊन जर कां कांहीं बोललीस तर याद राख !

**चंद्रिका** : इतका कैवार घ्यायला येतो त्यांचा, तर मग घरीं तरी कशाला येतां? फिरत जा त्यांच्याबरोबरच !

**चंद्रकांत** : अग पण तुला वेडबीड लागलं आहे कीं काय? नटी म्हणजे इतका भयंकर प्राणी वाटतो तुला?

**चंद्रिका** : भयंकरच, नाहीं तर काय फार सज्जन असतात त्या?

**चंद्रकांत** : अगदी वेडी आहेस तूं चंद्रा! त्यांच्यासारख्या निरुपद्रवी, त्यांच्यासारख्या मनमिळाऊ, त्यांच्यासारख्या—

**चंद्रिका** : फाजील त्याच असतात! मला माहीत आहे–कांहीं नको सांगायला?

**चंद्रकांत** : तुला कांहींच माहीत नाही चंद्रा! त्यादेखील सरळ असतात! शालीन असतात! कुलीन असतात!!

**चंद्रिका** : हें मला तुम्ही सांगता? आणि मी त्यावर पटकन् विश्वास ठेवावा म्हणता? काय हो, त्या दिवशीं रंगीत तालीम बघायला मी आलें होतें तेव्हां तुमची ती नटी मुद्दाम तुम्हांला खेटून कां हो बसत होती?

**चंद्रकांत** : अग पण ती जवळ येतांच मी उठून दुसरीकडे जात नव्हतों का?

**चंद्रिका** : मी तिथं होतें म्हणून तुम्ही तिला मुद्दाम टाळण्याचा प्रयत्न करीत होतां. समजतं बरं मारं कांही मला हें! मी कुक्कुलं बाळ नाहीं!

**चंद्रकांत** : हें बघ चंद्रिके, अजून तूं अंड्यांत आहेस!

**चंद्रिका** : आणि तुम्हांला मात्र पंख फुटून तुम्ही हवं तिकडं उडूं बागडूं लागला आहांत, असंच ना? पण आतां मी सांगून ठेवतें, हीं तुमचीं नाटकं पुरें झालीं आतां! ह्यापुढं कोणती नटीफिटी घरीं आणाल, तर लाटणं घालीन टाळक्यांत तिच्या!–काय?

**चंद्रकांत** : आणतोय कोण लेकाचा आतां नट्यांना घरीं! हें बघ, आतां मीं मुद्दां ठरवून ठेवलंय बघ, काय वाटेल तें झालें, तरी आतां स्वतः पैसे घालून स्वतःचं नाटक लावायचं नाहीं थिएटरला!

**चंद्रिका** : खरं ना पण हें अगदी?

**चंद्रकांत** : अगदीं खरं! झाली एवढी स्वतः नाटक लावायची हौस पुरे झाली आतां!

**चंद्रिका** : मग उठा पाहूं आतां–दोन पैशांची तुरीची डाळ घेऊन या!

**चंद्रकांत** : पुन्हां तुरीची डाळ— !

**चंद्रिका** : उठा ना–माझं एवढं देखील ऐकायचं नाहीं का?

**चंद्रकांत :** तुझं ऐकून स्वत: नाटक लावणार नाहीं हें मान्य केलं ना मीं! मग माझं नाहीं ऐकणार तूं आतां ?

**चंद्रिका :** असं काय तें? मी आपल्या कुठल्या गोष्टीला कधीं नाहीं म्हटले आहे का? आपल्या समाधानासाठीं मीं आजवर किती गोष्टींना होकार दिला. आपण मागं एक मासिक काढलं, त्याला मी अडथळा केला नाहीं. आपण आपलीं कांहीं पुस्तकं प्रसिद्ध करायला पैसे मागीतले, ते मीं दिले. आपण नाटकांत नट्यांच्या बरोबर उधळलांत–तरी मी गप्प बसलें!– –

**चंद्रकांत :** खरंच चंद्रिका! तूं म्हणून हें सारं सारं सहन केलंस! नाहीं तर मी आज कुठं असतों! आज मी लेखक बनलों आहे, मोठा नाटककार झालों आहे–पण ह्या साऱ्या यशाचा मोठा मान तुझा आहे. मी नुसतं लिहिलं. पण तूं–तूं त्या लिखाणाला स्फूर्ति दिलीस–मी नुसतं सांगितलं, पण तूं–तू सारं सारं माझ्यापुढें साकार केलंस! आतां एक गोष्ट आणखी माझ्यासाठीं करणार नाहींस का तूं?

**चंद्रिका :** काय करूं? सांगा, आपणासाठीं मी वाटेल तें करायला तयार आहे!

**चंद्रकांत :** आतां ह्या क्षणाला तुला मोठं दिव्य करायला मी सांगत नाहीं... जाऊन तुरीची डाळ घेऊन ये. मला नव्या नाटकाचा विचार करूं दे.

**चंद्रिका :** [ खट्टू होऊन ] आणा पैसे; आणतें मी तुरीची डाळ!

**चंद्रकांत :** प—पैसे ?—

**चंद्रिका :** दोन पैसे हवेत मला तुरीच्या डाळीसाठीं!

**चंद्रकांत :** अग, पण पैसे आहेत कुठं माझ्याजवळ!

**चंद्रिका :** दोन पैसे जवळ नाहीत तुमच्या ?–लिहा, नवीं नाटकं लिहा! 'टांगून झालं पाहिजे!' अं!

**चंद्रकांत :** तुला माणसाच्या भावना कशा ग समजत नाहींत! थट्टा करतेस काय माझी ?

**चंद्रिका :** थट्टा? काय थट्टा केली मीं तुमची?

**चंद्रकांत :** आतां तूं माझ्याजवळ पैसे मागीतलेस–तुला चांगलं माहीत असतां तूं ह्या गोष्टी कां करतेस?

**चंद्रिका :** मला तुरीची डाळ हवी होती म्हणून—

**चंद्रकांत :** म्हणून तूं माझ्याजवळ पैसे मागीतलेस! मी कोण आहे? लेखक

आहें मी...लेखकाजवळ पैसे असतात ? लक्ष्मी आणि सरस्वती ह्यांचं वैर असतं हें माहीत नाहीं तुला ?...माहीत आहे ? आणि तरी तूं पैसे मागितलेस ! माझ्याजवळ पैसे मागितलेस ! मी छपन्न पुस्तकांचा लेखक आहे हें माहीत नाहीं तुला ?

**चंद्रिका** : दुपारच्या जेवणाला तीं पुस्तकं खाणार आहांत का ?

**चंद्रकांत** : झालं ! ही माझ्या सारस्वताची कदर ! तुला मानसशास्त्र समजतं ? सायकॉलॉजी समजते ? वाङ्मय कशाशीं खातात कळतं ? खुशाल माझ्याजवळ पैसे मागतेस ? अडाणी !...रानटी !...जंगली ! !

**चंद्रिका** : ठीक आहे ! मी अडाणी आहे, रानटी आहे, जंगली आहे, बसा तुम्ही नाटकांची जुळणी करीत. ही मी आंत जाऊन बसतें. आज घरांत एकादशी पाळूं आपण !

[ फणकाऱ्यानें आंत निघून जाते

**चंद्रकांत** : अग पण–ए–ए—

[ मुरली प्रवेशतो

**मुरली** : काय चंद्रकांत, आहांत कां ? काय चाललंय ? ताई कुठं दिसत नाहींत ?

**चंद्रकांत** : आहे ना घरांतच. चंद्रिका–ए–अग हे मुरलीधर आले आहेत बाहेर.

**मुरली** : काय ताई, काय चाललंय ? [ चंद्रिका बाहेर येते ] काय फार गडबडींत ?

**चंद्रकांत** : छे छे, गडबड कसली ! तुरीची डाळ आणायला ती एवढ्यांत जायला सांगत होती मला. पण आतां तुम्ही आलांत. आणील तीच ! [ चंद्रिका फणकाऱ्यानें बाहेर जाते ] हं, बोला मुरलीधर ! कसं काय रात्रीचं नाटक आपलं ?

**मुरली** : नाटक अगदीं ‘ टॉप ’ ला गेलं रात्रीचं ! काय रंगत चढली ! माणसं नुसतीं नागासारखी डोलत होतीं ! अगदीं पिन ड्रॉप सायलेन्स !

**चंद्रकांत** : पण शेवटचा अंक त्या मानानें तितका रंगला नाहीं !

**मुरली** : तुमच्या लिखाणाचा दोष नाहीं तो चंद्रकांत. ती नटी फडतूस होती तिथं नाटक खालीं येणार नाहीं तर काय होईल ? पण दुसरा अंक काय बेफाम झाला !

**चंद्रकांत** : ऑडियन्स क्लास होतं ! गल्ला बरा आला शिवाय ! रात्रीं कॅश गल्ला पाऊणशें रुपये ! !

**मुरली** : खर्च निघाला ना ?

**चंद्रकांत** : नेट खर्च किती झाला माहीत आहे? सहाशें तेहतीस रुपये सात आणे नऊ पै !

**मुरली** : आणि कॅश कॅन्व्हसिंग ?

**चंद्रकांत** : थिएटरवर झालेली पाऊणशें रुपये ! बाकी उधार खूप झाली आहे. नऊशें नव्व्याण्णव रुपयांची उधार तिकिटं विकली आहेत !

**मुरली** : अरे वा ! म्हणजे मग तीनशें रुपये नुसता फायदा झालाय् कीं ! छान ! पार्टी पाहिजे अं चंद्रकांत झकासपैकीं !

**चंद्रकांत** : पार्टीचं काय हो ! पार्टी केव्हांही देऊं. एकदां हे पैसे तर येऊं देत. मग पार्टीला काय वेळ लागतो. स्वतः तुम्हीच तर साठ रुपयांची तिकिटं विकलेलीं आहेत !

**मुरली** : –हो ! –बराय् चंद्रकांत, येतों मी आतां—

**चंद्रकांत** : कां हो मुरलीधर, निघालांत देखील ? –नाहीं म्हणजे, पार्टीचं बोलत होतों आपण—

**मुरली** : बोलूंच पुन्हां आपण पार्टीचं– जाते कुठं पार्टी !

**चंद्रकांत** : बरें, त्या तुमच्या विकलेल्या तिकिटांच्या पैशांचं–म्हणजे–अडचण आहे म्हणून म्हणतों हो–! ते साठ रुपये जर मिळाले तर...

**मुरली** : वा चंद्रकांत, अहो वेड लागलं कीं काय तुम्हांला ! काल तर खेळ झाला, अजून चोवीस तास सुद्धां पुरते लोटलेले नाहींत ! नि पैसे कसले मागतां ?

**चंद्रकांत** : नाहीं–म्हणजे तशी घाई नाहीं मला पैशांची ! उधार तिकिटं विकलीत त्यांची रक्कम सावकाश येऊं दे ! पण कॅश कांहीं विकलीं असतील, तीं म्हणतों मी ! म्हणजे अडचण झाली आहे पाहा !

**मुरली** : त्याचं असं आहे चंद्रकांत, माझी देखील अडचणच झाली आहे म्हणून ! नाहीं तर साठ रुपये म्हणजे मोठीशी बात नाहीं. स्वतःच देऊन टाकले असते मीं, नि नंतर वसूली केली असती. पण मला बिलकूल सवड होण्यासारखी नाहीं पाहा. पैसे बुडणार नाहींत. पण जरा अवधी लागेल ! थोडी कळ काढाल तर पाहा—

**चंद्रकांत** : माझ्याबद्दल तुम्हांला आपुलकी होती म्हणून तुम्हीं तीं सारीं तिकिटं विकण्याची खटपट केलीत मुरलीधर. तुमचे हे केवढे उपकार झालेत माझ्यावर ! ते आभार मानायचे सोडून पैसे मागायची मीं घाई करायला नको होती, हें

मी जाणतों. पण अगदींच नाइलाज झाला, आतां दहा दिवसांत करमणूककराचे पैसे भरायला हवेत. आणि...आणि माझ्याजवळ तर एक पैसा शिल्लक नाहीं !

**मुरली** : पगार होणार असेल अजून तुमचा ?

**चंद्रकांत** : निम्मा पगार उचल म्हणून नाटकासाठी घेतला आहे. घर खर्च उधारीवर चालवला; तो डोंगर शिरावर निस्तरायचा आहे. तो निस्तरायला उरलेला निम्मा पगार खर्ची घालावा लागणार आहे ! एवढ्या हुरुपानं नाटक लावलं, पण खरं विचारलं तर आतां मात्र त्या रंगभूमीचं तोंड बघूं नये असं झालंय मला...तूं येण्याआधी चंद्रिका हट्ट धरून बसली होती. दोन पैसे हवे होते तिला तुरीच्या डाळीसाठी ! पण ते दोन पैसे आज खिशांत नव्हते माझ्या !

**मुरली** : अरे ! इतकी अडचण असतां एका शब्दानेंहि बोलूं नये तुम्ही आमच्यासारख्या मित्रांपाशीं ?

**चंद्रकांत** : मुरली, पैसा वाईट आहे ! चार माणसांत बसवतो, आणि चार माणसांतून उठवतो !

**मुरली** : आम्हांला तुम्ही परके समजतां का चंद्रकांत ? अशा अडचणींत आमचा तुम्हांला उपयोग नाहीं, मग मैत्री हवी कशाला तुमची आमची ?

**चंद्रकांत** : पण तुम्हांलाहि तुमचा संसार आहेच ! तेव्हां...

**मुरली** : अहो म्हणून काय झालं ? तुमचे हक्काचे पैसे आम्ही तुम्हांला देऊं नयेत की काय ? आम्ही माणुसकी पार विसरून गेलों कीं काय ? निदान विकलेल्या तिकिटांचे सारे पैसे तरी मी तुम्हांला देणारच ! नाहीं म्हणूं नका !

**चंद्रकांत** : तिकिटांचे पैसे घ्यायला मला संकोच वाटणार नाहीं. पण मग केव्हां देणार म्हणतां ते तिकिटांचे पैसे ?

**मुरली** : देईन, लौकरच देईन. निदान थोडे फार तरी देईनच देईन.

**चंद्रकांत** : आतां किती देणार ?—

**मुरली** : आतां ? छे, आतां नाहींत. नाहीं तर दिलेच असते पाहा– अडवून धरणारा माणूस मी नाहीं हें तुम्हांला माहीत आहे.

**चंद्रकांत** : उद्यां ?...दोन चार दिवसांनीं ?...दोन तीन आठवड्यांनीं तरी ?—

**मुरली** : तुम्हांला खरोखर इतकी गरज होती पैशांची तर मला तुम्हीं आधीं कां सांगितलं नाहीं ? म्हणजे उधार तिकिटं अजिबात विकलीच नसतीं मीं ! सारा व्यवहार आपला रोखीचा झाला असता. पण तुम्ही म्हणालांत, काय वाटेल तें झालं तरी थिएटर भरलं पाहिजे. पैसे नंतर मिळाले तरी चालतील !

**चंद्रकांत :** पण शक्य तेवढीं रोखीनंच तिकिटं विका असंहि मीं सांगितलं होतं सर्वांना !

**मुरली :** नाटकाचीं तिकिटं आधीं विकायला कठीण. तुम्हांसारखे छपन्न पुस्तकांचे लेखक म्हणून तुमच्या नाटकाला निदान उधार तिकिटं घेऊन तरी प्रेक्षक आले ! बाकी नाटककारांचं पाहा ना, पुढच्या रांगा फुकट्या प्रेक्षकांनीं भरलेल्या–मागं सारा शुकशुकाट !

**चंद्रकांत :** मग मला जरा थांबावं लागणार म्हणतां ?

**मुरली :** थांबलंच पाहिजे ! उपाय नाहीं !

**चंद्रकांत :** किती दिवस थांबावं लागेल !

**मुरली :** फार नाहीं हो, एक चार महिने थांबा,—

**चंद्रकांत :** च्–चार महिने ?

**मुरली :** एखादा महिना कमी जास्ती !

**चंद्रकांत :** जास्ती नको, कमीच झाले तर पाहा !

**मुरली :** अच्छा, तीन महिने ! बस् ? तेवढ्या मुदतींत नाहीं वसुली झाली, तर मी स्वतःच्या खिशांतून देईन !

**चंद्रकांत :** थँक्स !

**मुरली :** बरं, जाऊं दे मरूं दे हें ! पुढचं नाटक कोणतं घेतलं आहे ?

**चंद्रकांत :** वा राजा ! पुढचं नाटक मोटं मस्त आहे अं ! 'टाम्‌न झालं पाहिजे !'

**मुरली :** तें होणारच. पण नांव काय नाटकाचं ?

**चंद्रकांत :** अरे नाटकाचं नांवच सांगितलं मीं तुला ! 'टाम्‌न झालं पाहिजे !'

**मुरली :** वा ! म्हणजे तमाशा बिमाशाचा सीन आहे की काय त्यांत ?

**चंद्रकांत :** मग काय तर ! आणि ती भाऊ मांगाच्या तमाशांतली ती फटाकडी पोर मनोरमा–ती आणायची आहे नटी म्हणून !

**मुरली :** आम्हाला काम आहे कीं नाहीं ?

**चंद्रकांत :** संच आपला नेहमींचाच !

**मुरली :** आणि त्या पोरीबरोबर माझं काम ?

**चंद्रकांत :** नक्की ! थिएटर उलटं झालं पाहिजे ! [ चंद्रिका येते ] चहा सांगितलास खालून ?

**चंद्रिका :** विसरलें मी !

[ आंत निघून जाते.

**मुरली** : चहाची तेवढी आवश्यकता नाहीं. घर आपलंच आहे !

**चंद्रकांत** : छे छे, असं कुठं झालं आहे ! चहा घेतलाच पाहिजे. ए चंद्रा, जा, जाऊन चहा सांग दोन खालीं.

**चंद्रिका** : [ आंतूनच ] जा तुम्हीच आतां खालीं. मला आलाय् कंटाळा !

**चंद्रकांत** : काय बायको आहे पाहा ही ! इकडं ये पाहूं लौकर. [ चंद्रिका बाहेर येते ] काय ग, फार लाडावलीस होय तूं? आतां चहा आणणार कीं नाहीं?

**मुरली** : अहो पण नकोय् चहा मला. ताई, नका जाऊं तुम्ही खालीं.

**चंद्रकांत** : मी सांगतों गेलंच पाहिजे !

**चंद्रिका** : ठीक आहे, जाते मी खाली. द्या पैसे !

**चंद्रकांत** : पैसे ? खबरदार पैसे मागितलेस तर ! परक्या माणसापुढं माझा अपमान करण्याची तुला वाईट संवय लागली आहे बघ !

**मुरली** : अहो पण मी परका आहे कुठं ह्या घरांत ?

**चंद्रकांत** : तुम्ही गप्प बसा जरा–जा, बघत राहूं नकोस उगीच–चहा घेऊन ये—

**चंद्रिका** : माझ्याजवळ पैसे नाहींत !

**चंद्रकांत** : पैसे नाहींत ?... म्हणून तूं जात नव्हतीस ?–मग असं सांगायला काय झालं तुला ? जात नाहीं असं उत्तर ऐकून माणसाचा गैरसमज केवढा होतो ? तूं माझ्या कह्यांत नाहींस असं ऐकणाराला वाटलं तर ? [ चंद्रिका तोंड फुगवून जाऊं लागते ] थांब ! [ ती थांबते ] तुरीची डाळ आणलीस ?

**चंद्रिका** : तो मेला वाणी उधार द्यायला तयार नाहीं !

**चंद्रकांत** : काय म्हणालीस ? उधार द्यायला तयार नाही ? स्वातंत्र्य मिळाल्या-पासून हे तीन दोंडीचे माजले आहेत लेकाचे ! मला उधार देत नाहीं म्हणतो काय ! मुरलीधर, चला हो खालीं जरा; त्याचे लेकाचे कान उपटतों मी तुमच्या समक्षच !

**चंद्रिका** : अगबाई ! असं काहीं करूं नका—

**चंद्रकांत** : कां ? भीती आहे कीं काय कुणाची मला ! चोरी नाहीं करीत मी ! उधार मागण्याचं स्वातंत्र्य देखील नाहीं कीं काय ह्या स्वतंत्र हिंदुस्तानांत ? चला मुरलीधर...

[ जायला निघतात.

**चंद्रिका** : मी येऊं का खालीं ?

**चंद्रकांत :** तूं? तूं कशाला आणखी ?

**चंद्रिका :** तुम्ही भडकून जाऊन कांहीं बोलाल बिलाल !

**चंद्रकांत :** म्हणून तर तूं येऊं नकोस ! मी कांहीं बोललों आणि त्यावर त्यानं कांही उणा शब्द दिला, तर तुझ्या समक्ष तो ऐकून घेण्यांत मला मेल्याहून मेल्यासारखं होईल ! येऊं नको तूं ! आलोंच मी तुरीची डाळ घेऊन ! चला हो !

[ दोघे जातात

**चंद्रिका :** हा आहे आमचा संसार !—[ गाते ]

**लहान सुंदर फांदीवर घर**
**दोघांचा संसार ।**
**चालुन जाईल जोंवर नाहीं**
**पोरांचें लेंढार** ॥ ध्रु० ॥
**चंचल चिमणा उंच भराऱ्या मारूं बघतो दूर**
**चिमणी त्याची गरिब बापडी बसते चिंतातूर**
**शुद्धि न त्याला पोटोबाची अवखळ अजुनी पोर**
**चालुन जाईल जोंवर नाहीं**
**पोरांचें लेंढार** ॥ १ ॥

[ प्रकाश बाहेरून आंत येत आहे

**प्रकाश :** आहांत कां घरीं चंद्रकांत !—नमस्ते वहिनी !

**चंद्रिका :** या प्रकाशभाओजी. हे इतक्यांत बाहेर गेले--

**प्रकाश** ? अर्रर्र ! बाहेर गेले ? कुठं ?

**चंद्रिका :** इतक्यांत खालीं गेले. येतीलच आतां. तुरीची डाळ आणायला गेले आहेत खालीं.

**प्रकाश :** तुरीची डाळ म्हणजे ? आज वरणभाताचा बेत दिसतोंच ! आम्हांला वाटलं, रात्रीं इतकं सुंदर नाटक झालं म्हणून आज नाटककारांच्या घरीं मस्त शिरापुरीचा बेत असेल ! म्हणून मुद्दाम जेवणाच्या वेळेलाच गांठून आलों होतों आम्ही ! पण बघावं तर इथं साधा वरणभाताचा बेत !

**चंद्रिका :** वरणभात खायला आम्ही थोडेच कोंकणी आहोंत तुमच्यासारखे !

**प्रकाश :** वरणभात खाणारा कोंकणी नव्हे मी वैनी ! मला भातावर मासळी लागते !

**चंद्रिका :** पण आज आमच्या इथं तुम्हांला मासळीही मिळायची नाहीं न्

भातही मिळायचा नाहीं. हवं तर जरा वेळ थांबलांत तर लाल जोंधळ्याची भाकर न् वरण देईन थोडंसं !

**प्रकाश** : लाल जोंधळ्याची भाकरी न् वरण ?—शी : ! नको बुवा ! भाताशिवाय आमची भूक जात नाहीं !

**चंद्रिका** : भुकेल्या माणसाची भूक कोंडा खाल्ला तरी जाते भाऊजी ! आमच्या इथं तर भाकरी आहे !

**प्रकाश** : लेखकाची बायको आहांत वैनी, बोलायला थोड्याच हार जाणार तुम्ही आम्हांला ? बरं पण तें जाऊं दे–रात्रीचं नाटक मोठं मस्त झालं बरं कां वैनी ! खास अभिनंदन करायला आलों आहें मी चंद्रकांतांचं !

**चंद्रिका** : सकाळपासून जो येतो तो अभिनंदनच करतोय् त्यांचं भावोजी !

**प्रकाश** : कां नाहीं करणार वैनी ! नाटक पण नाटक झालं. विषय काय मस्त होता म्हणता ! वा: ! एकुणीसशें एकसष्ठ सालच्या एप्रिल महिन्याच्या पहिल्या तारखेला भारतांत जर 'लाल राज्य' झालं तर काय होईल ! ब्यूटी ! ह्याला म्हणतात विषय वहिनी ! काय ?

**चंद्रिका** : हो !

**प्रकाश** : बरं ऑडियन्स कसं अगदीं क्लास ! मी तर ए रांगेंत चौदा नंबरच्या खुर्चीवर बसलेला ! चार दिवस आधीं पास आणून दिलेला मला चंद्रकांतांनीं, तेव्हां मुद्दाम आलों ! जिव्हाळा आहे आमचा वैनी !

**चंद्रिका** : अर्ध्या मुंबईचा नि त्यांचा जिव्हाळा आहे भावोजी ! म्हणून प्रत्येक नाटक पासावारी दाखवताहेत आणि दुसऱ्या दिवशीं तुरीच्या डाळीला महाग होताहेत !

**प्रकाश** : आतां तुम्ही बोललांत म्हणून बोलतों मी वैनी, खरं सांगायचं तर आतां तुम्ही म्हणालांत ना, तें आहे त्यांचं. चंद्रकांतांना अक्कल नाहीं—

**चंद्रिका** : प्रकाश भावोजी, तोंड आवरून बोला ! कुणाला अक्कल नाहीं म्हणतां ?

**प्रकाश** : ऑं ! अहो आतांच तुम्ही म्हणालांत तसं म्हणून मी—!

**चंद्रिका** : म्हणून तुम्ही त्यांना बेअक्कल ठरवून मोकळे झालांत ! पण मी त्यांना बेअक्कल म्हटलें नाहीं ! तुमच्यासारखे लोक त्यांच्या प्रेमळपणाचा फायदा घेतात. आणि इकडे आम्हांला त्रास होतो...

**प्रकाश** : तुम्ही पराचा कावळा करून भांडायला उठल्यासारखं काय करतां वहिनी ? सहज विषय निघाला म्हणून—

**चंद्रिका** : तुम्ही आपली जीभ सैल सोडलीत ?

**प्रकाश** : पण प्रथम विषय तुम्हीं काढलांत वैनी !

**चंद्रिका** : विषय काढला असेन मी, पण तुम्हांला बोलायचा काय हक्क आहे त्यांना ? मी बोलेन हवी तर ! बायको आहे मी त्यांची !

**प्रकाश** : आणि मी त्यांचा हितचिंतक नव्हे का ? मित्र नव्हे का ? त्यांच्या साठीं तुम्ही कराल तो त्याग मी देखील करूं शकणार नाही कां ?

**चंद्रिका** : त्यांच्या नाटकाचं साधं तिकीट तुम्हीं पैसे खर्च करून घेतलेलं नाही. त्यागाचं कशाला सांगतां ?

**प्रकाश** : ह्या घरांत मला नेहमी यायला आवडतं तें ह्या एकाच कारणामुळं बरं वैनी !–तुम्ही दोघं नवरा बायको अशीं मोकळया मनाचीं माणसं, अशीं विनोदी !–बरं तें राहूं दे आतां. मी एक आनंदाची बातमी सांगूं—?

**चंद्रिका** : कसली बातमी ?

**प्रकाश** : तुम्हांला ती ऐकून खूप खूप आनंद होईल अशी.–पण माझी त्यासाठीं एक अट आहे ! कबूल ?

**चंद्रिका** : पण ती अट तर समजूं दे आधीं !

**प्रकाश** : एक झकासपैकी रॉजर्सचा थंडा सोडा !

**चंद्रिका** : झकासपैकीं सोडा ?–बस ?

**प्रकाश** : बस !

**चंद्रिका** : प्रकाश भावोजी, तुम्ही परके नाही. तुमच्यापेक्षां सोडा अधिक किमतीचा नाही ! पण–पण घरांत आज त्या सोड्याहून थंडा मामला झाला आहे !–माटांतलं थंड पाणी आणतें हं !

[ चंद्रिका अश्रु लपवीत आंत जाते आणि पाणी घेऊन येते

**प्रकाश** : [ पिऊन ] हा वैनी ! मोठी लज्जत आहे हं तुमच्या माटांतल्या पाण्याला ! रॉजर्स झक् मारतो !

**चंद्रिका** : लेखकाचं पाणी आहे ! उगीच नाहीं !

**प्रकाश** : बरं ती आनंदाची बातमी !

**चंद्रिका** : सांगा...

**प्रकाश** : नाट्य-अलंकार क्लब मी आज बारा वर्षे चालवीत आहे हें तुम्हांला माहीतच आहे. आतांपर्यंत किती तरी नाटकं आम्हीं रंगभूमीवर आणून गाजवून सोडलीं आहेत हेंही तुम्हांला माहीत आहेच ! रात्रीं 'लाल राज्य' नाटकाचा

प्रयोग पाहिल्यानंतर आम्हीं आतां त्याचा प्रयोग आमच्या क्लबतर्फे बसवायचं नक्की ठरवून टाकलं आहे–खास त्यासाठीं मी आज इथं आलों होतों वैनी ! आहे ना आनंदाची बातमी !

**चंद्रिका** : त्यांना ही बातमी ऐकून फार आनंद होईल हें खरं आहे !

**प्रकाश** : आणि तुम्हांला ?–वैनी, नाट्य–अलंकार मामुली क्लब नाहीं ! आतांपर्यंतचे प्रयोग पाहून गेलेले लेखक शंभर चकरा घालताहेत दारावर माझ्या. पायां पडताहेत–म्हणाताहेत, फुकट नाटक घ्या आमचं–एक छदाम मोबदला देऊं नका–पण प्रयोग करून रंगभूमीवर आणा... मी त्यांना सरळ हाकलून देतों ! कां ? कारण नाहीं विचारलंत ?

**चंद्रिका** : पैसे नसतील खिशांत तुमच्या प्रयोग लावण्यापुरते ?

**प्रकाश** : झालं ! ही तुम्हीं आमची किंमत केलीत वहिनी ! इतर क्लबसारखा वीस वीस रुपये वर्गणी घेऊन हा क्लब मी चालवतों असा तर तुमचा समज नाहीं ना ?–तसं नाहीं बरं का वैनी. मी हौशी निर्माता असतों तरी धंदा म्हणूनच नाटकं लावतों–आजवर नाटकांत तोटा झालेला नाही मला अजिबात !

**चंद्रिका** : असं ?

**प्रकाश** : माणसाची एक नजर असते वैनी ! फडतुस नाटकं घेऊन थर्डक्लास लोकांनीं केलीं तर तीं पडणार हें नक्की ! आपलं तसं नाहीं ! सारं काम टॉपचं !

**चंद्रिका** : टॉपचं म्हणजे ?

**प्रकाश** : हायक्लास ! ' लाल राज्य ' नाटकासारखं नाटक हवं ! रात्रीं त्याचा प्रयोग झाला–आम्ही कसा करतों तें पाहा—

**चंद्रिका** : मोबदला वगैरे देणार असालच्च ?

**प्रकाश** : मोबदला न देऊन कसं चालेल ? पाऊणशें रुपायांवाल्या नट्या घेऊं दोन ! शिवाय दिग्दर्शकाला पाऊणशें...संगीतवाल्याला सव्वाशें...!

**चंद्रिका** : [ भीत भीत ] पण ह्यांना किती देणार ?

**प्रकाश** : चंद्रकांतला ? वा ? देऊं ना ! लेखकांना अजून तरी आम्ही मोबदला दिला नाहीं. आपल्या क्लबजवळ एका लेखकानं अजून मोबदला कसा तो मागितला नाहीं.

**चंद्रिका** : मग ते लेखकही त्याच लायकीचे असतील !

**प्रकाश** : त्याच लायकीचे म्हणजे ?

**चंद्रिका** दुसऱ्यांचीं पुस्तकं चोरून लिहीत असतील ?

**प्रकाश** : नाहीं नाहीं वहिनी ! सारेच लेखक तसे नाहींत अं ! कांहीं स्वतःचं देखील बरंचसं लिहिणारे आहेत !—

**चंद्रिका** : असं ?

**प्रकाश** : हो तर ! पण चंद्रकांतची गोष्ट सर्व लेखकांहून निराळी आहे वैनी ! त्यांचा आमचा परिचय ! त्यांचे आमचे संबंध ! !

**चंद्रिका** : फारच जिव्हाळ्याचे ! फारच घनिष्ठ ! !

**प्रकाश** : आणि म्हणून तर आम्ही त्यांना ह्या नाटकाच्या प्रयोगाची कॅश् फी देणार !

**चंद्रिका** : खरंच ?

**प्रकाश** : आतां काय करावं ! अजून शंका वाटते कां तुम्हांला वैनी ! अहो, ॲडव्हान्स देखील घेऊन आलोंय् मी आतांच ! हो ! पाच रुपये ! देऊनच जाणार आहें मी तो आतां तुम्हांला !

**चंद्रिका** : पांच रुपये ॲडव्हान्स ! [ स्वगत ] मी स्वप्नांत तर नाहीं ना ! [ प्रगट ] प्रकाश भाऊजी, मी तुम्हांला मघाशीं कठोर बोललें. मनावर नका अं घेऊं तें ! माझा स्वभाव असा फटकळ आहे—पण मनांत कांहीं नसतं माझ्या !

**प्रकाश** : तें मी जाणून आहे वहिनी ! मघाशीं मला तुम्ही आमच्या चंद्रकांतच्या नाटकाचा फुकट्या प्रेक्षक म्हणून खोंचून बोलल्यासारखं बोललांत ! पण मला राग आला म्हणतां कीं काय ?—नांव नको बरं वहिनी ! [ पैसे काढून ] घ्या, ही पांचाची नोट घ्या—हा झाला ॲडव्हान्स ! बाकी पैसे प्रयोगाचे दिवशीं !

**चंद्रिका** : [ नोट घेत ] बाकी पैसे किती म्हणालांत ?

**प्रकाश** : हे पांच तर झालेच ! आणखी दहा रुपये प्रयोगाचे दिवशीं देऊं ! चंद्रकांत आपले आहेत म्हणून हो !

**चंद्रिका** : दहा रुपये ! नुसते दहाच रुपये देणार आणखी ?

**प्रकाश** : काय वेडबीड लागलं कीं काय वैनी तुम्हांला ? पंधरा रुपये एका प्रयोगाचे सर्व मिळून म्हणतोय् मी !

**चंद्रिका** : पण कमींत कमी पंचवीस तीस तरी देतात ना ? ?—

**प्रकाश** : छदाम देत नाहींत ! उलट लेखक पैसे देतो आपलं नाटक रंगभूमीवर यावं म्हणून ।

**चंद्रिका** [ नोट परत करीत ] भाऊजी, हे पैसे परत घ्या. ह्यांना तें कबूल होणार नाहीं.

**प्रकाश** : चंद्रकांतला ? काय वेड लागलं की काय तुम्हांला वैनी ! रात्रीं चंद्रकांतचं अभिनंदन मीं केलं, तेव्हां ते म्हणाले, हवं तर एका नटीचे पैसे मी देतों; पण ' लाल राज्य ' नाटकाचा दुसरा प्रयोग तुम्ही लावा !

**चंद्रिका** : छे ! असं कसं म्हणतील तें !

**प्रकाश** : मग मी खोटं सांगतों होय ? मला त्यांचं नाटक फुकटांत घ्यायला नको, म्हणून खुपीनं मी हे पैसे देत आहे—नाहीं तरी एवीतेवी तें घरांत धूळ खातच पडून राहणार आहे !

**चंद्रिका** : असं बोलूं नका भाऊजी ! त्यांना त्यांच्या नाटकांविषयीं असं बोललेलं आवडत नाहीं.

**प्रकाश** : पण खोटं नाहीं तें !—तुम्हांला माहीत आहे तें खोटं नाहीं ! [ ती नोट पुढें करते ] राहूं द्या ते पैसे !

**चंद्रिका** : छे ! नको—ते नाहींत कबूल होणार.

**प्रकाश** : मी करीन त्यांना कबूल—राहूं द्या ते पैसे.

**चंद्रिका** : हे पैसे घ्या—मी सांगेन त्यांना नाटक द्यायचं नाहीं म्हणून—घ्या हे पैसे परत आपले—

**प्रकाश** : एकदां दिलेले पैसे मी परत घेत नसतों—घेणार नाहीं हे पैसे मी—

**चंद्रिका** : वाटेल त्या माणसाचे पैसे मींही कधीं स्वीकारले नाहीत. भाऊजी— हे पैसे घ्या, आणि निघून जा—ते येतील तेव्हां त्यांना तुम्ही ते द्या—घ्या म्हणतें ना...

**प्रकाश** : [ पैसे घेऊन ] इच्छा तुमची !—पण वैनी, मी हा माझा अपमान समजतों—मी आलों होतों, पण पुन्हां येणार नाहीं—असं चंद्रकांतना सांगा—जातों मी—

[ कुर्यात निघून जातो

**चंद्रिका** : ( स्वगत ) चंद्रकांत निष्कांचन असतील, पण त्यांनीं आणि त्यांच्या चांद्रिकेनं स्वाभिमान अजून विकला नाहीं ! [ गाते ]

**जतन करावा अभिमान उरीं**
**ठेव गमत ह्या तो संसारीं ॥ धृ० ॥**
**हीन भाव मनिं दुःसह भारी**
**मानवतेचा गमतो वैरी ॥ १ ॥**

[ शाबास ! चंद्रिके, शाबास ! ! उपाशी तरी सधन आहेस तूं ! दरिद्री तरी कुबेर आहेस तूं ! ' दुनियेंत पैसा असेल तोच माणूस ' हें चुकीचं विधान किती सही सही खोडून काढलंस तूं ! ]

[ चंद्रकांत गडबडीनें प्रवेश करतो

**चंद्रकांत** : काय मूर्ख बायको आहेस ग तूं! मला कांहीं मान अपमान आहे ह्याची तुला जाणीव कशी ग नाहीं!

**चंद्रिका** : आतां काय झालं ?

**चंद्रकांत** : [ वेडावून ] ॲ टॉ कॅ य् झालं ? दोन पैशांची तुरीची डाळ बाजारांत कुणी विकीत नाहीं हें तूं मला सांगितलं कां नाहींस ?

**चंद्रिका** : दोन पैशांची डाळ मी रोज आणतें. कोण म्हणतं मिळत नाहीं म्हणून!

**चंद्रकांत** : तो तीन शेंडीचा मारवाडी म्हणतो न् कोण ? लेकाचा बायकांना दोन पैशांची डाळ देतो, पुरुषांना द्यायला जीव जातो कीं काय त्याचा ?

**चंद्रिका** : जिभेला हाड असल्यासारखं बोलाल का जरा !

**चंद्रकांत** : जिभेला हाड ? कुठल्या ॲनॉटमींत जिभेला हाड असतं हें शिकलीस ग तूं ! जंगली ! !

**चंद्रिका** : आणा ती डाळ इकडं !

**चंद्रकांत** : भर माणसांत त्यानं मला सांगितलं डाळ मिळत नाहीं दोन पैशांची म्हणून ! बिचाऱ्या मुरलीला केवढी लाज वाटली माझ्याबरोबर आल्या-बद्दल–निघून गेला तो.

**चंद्रिका** : प्रकाश भावोजी आले होते, तेहि निघून गेले एवढ्यांत.

**चंद्रकांत** : प्र–कोण प्रकाश आला होता ! मग बसवून कां ठेवलं नाहींस त्याला मी येईपर्यंत ?

**चंद्रिका** : ते बसेनात; मग काय करायचं ? आले तसे गेले ते !

**चंद्रकांत** : आले तसे गेले कीं तूं हांकून लावलंस, कुणाला माहीत ! नवऱ्याचे मित्र म्हणजे प्लेगचे उंदीर वाटतात तुम्हां बायकांना ! तिरसटासारखी बोलली असशील त्याच्याशीं तूं !

**चंद्रिका** : मग सोडीन कीं काय ? तुमच्या नाटकांविषयीं तसं बोलल्यावर बोलणारच मी असं त्यांना !

**चंद्रकांत** : तसं...नी असं म्हणजे ? तूं नीट कांहीं सांगूच शकत नाहींस कां ? नीट सांग ना काय तें !

**चंद्रिका** : ठीक आहे. ऐका, नीट सांगतें–उगीच डोक्यांत राख घालून घेऊं नका. ते आले होते, कारण त्यांना तुमच्या 'लाल राज्य' नाटकाचा प्रयोग बसवायची परवानगी हवी होती !

**चंद्रकांत** : प्रयोग–! काय म्हणालीस चंदा ! प्रयोग !

**चंद्रिका** : पांच रुपये ॲडव्हान्स देत होते; नंतर दहा रुपये प्रयोगाचे दिवशीं देतों म्हणत होते.

**चंद्रकांत** : पांच–दहा–पंधरा रुपये ! चंद्रिके, चंदू तुला मी कुठं ठेवूं। तुझ्या–भोंवतीं मी गात नाचूं कीं तुला डोक्यावर घेऊन नाचूं! प्रयोग! माझ्या नाटकाचा प्रयोग!!–आणि मोबदला ! पंधरा रुपये ! !–अग, त्यांना चहा तरी दिलास ना !

**चंद्रिका** : हांकलून लावलं मीं त्यांना सरळ घराबाहेर !

**चंद्रकांत** : हाकू–! काय म्हणालीस तूं चंद्रे !

**चंद्रिका** : नाटकाच्या एका प्रयोगासाठीं नुसते पंधरा रुपये मोबदला घेणं हा अपमान आहे लेखकाचा !

**चंद्रकांत** : [ भडकून ] अग तूं बायको आहेस कीं मुसळ !–खरंच त्याला हांकलून लावलास की काय ?

**चंद्रिका** : [ चिडून ] हें बघा, मुसळबिसळ म्हणूं नका अं मला ! मला देखील भावना आहेत ! बायको झालें म्हणून वाटेल तें ऐकून घेणार नाहीं मी तुमचं; सांगून ठेवतें !

**चंद्रकांत** : अग पण तूं अशी कशी ग बायको ! घरीं आलेल्या नाट्य–निर्मात्याला तूं घराबाहेर त्याच्या पंधरा रुपयांसह हांकलून लावलंस !–छे छे छे–आतांच गेलं पाहिजे मला ! त्याची समजूत घातली पाहिजे–क्षमा मागितली पाहिजे !

[ गडबडीनें निघतो

**चंद्रिका** : [ कठोर आवाजानें ] चंद्रकांत ! [ थबकतो ] जाऊं नका !–थांबा, [ डोळ्यांत पाणी आणून ] जाऊं नका.

**चंद्रकांत** : अग पण—

**चंद्रिका** : [ आर्जवानें ] जाऊं नका ! जेवायची वेळ झाली आहे—

**चंद्रकांत** : तूं कर जेवण–मी जाऊन येतों—

**चंद्रिका** : माझं ऐकणार नाहीं का ?–ऐकणार ना ?

**चंद्रकांत** : [ व्याकळून ] रडतेस तूं चंदा ? कां ?

**चंद्रिका** : आपल्याला ते पैसे नकोत–गळ्याची शपथ आहे माझी तुम्हांला ! त्यापेक्षां फुकट नाटक द्या. प्रयोग व्हावा असं वाटतंय् तुम्हांला...तर फुकट द्या–! पण पंधरा रुपयांना नको !

**चंद्रकांत** : [आवंढा गिळून] ठीक आहे! नाहीं देत. तूं रडूं नको–फुकट नाटक देऊं आपण अं! पूस ते डोळे–हं–येऊं मी आतां?

**चंद्रिका** : थांबा, जेवण होऊं दे. मलाही भूक लागलीय–आतां करतें मी वरण–दोघंही जेऊं–मग जा—

**चंद्रकांत** : पण–पण–चंदा, डाळ नाहीं आणली मी ही तुरीची–

**चंद्रिका** : मग?

**चंद्रकांत** : दोन पैशांची तुरीची डाळ देत नाहीं म्हणाला तो, म्हणून चण्यांचं पीठ आणलं आहे!

**चंद्रिका** : चण्यांचं पीठ!–चालेल चण्यांचं पीठ–पिठलं करूं अं आपण! लौकर होईल.

**चंद्रकांत** : आणि तुरीच्या डाळीपेक्षां त्यांत व्हिटॅमिन बरे असतात म्हणे!

**चंद्रिका** : चला पाहूं आंत–

**चंद्रकांत** : सैपाकघरांत? कशाला ग!

**चंद्रिका** : माझ्याजवळ बसायला!

**चंद्रकांत** : कां? आठवण आली होय जुनी?

**चंद्रिका** : इश्श! जुनी कसली? आपलं लग्न इतकं जुनं झालं नाहीं अजून!

**चंद्रकांत** : छे! नुसतीं दहा तर वर्षं झालीं आपल्या लग्नाला.

**चंद्रिका** : मग! चलतां ना—

**चंद्रकांत** : चला, नाहीं म्हणून कसं चालणार!

[ दोघे हसत हसत जातात. पडदा पडतो

[ पडलेल्या पडद्यावर पुढील दृश्य दिसूं लागतें

---

## अंक १ ला  दृश्य २ रें

[ त्याच दिवसाची रात्र. गिरणगांवांतील सामसूम होऊं लागलेला रस्ता–चंद्रकांत विचाराच्या तंद्रीत घराकडे परत जात आहे. समोरून मुरली येतो. ]

**चंद्रकांत** : [ मुरलीचा नमस्कार स्वीकारीत ] कोण, मुरली? हॉलकडे गेला होता?

**मुरली** : बसलों होतों जरा वेळ. पण मन लागेना, आलों उठून.

**चंद्रकांत** : कुणाचं नाटक होतं?

**मुरली** : नवं नाटक होतं. काय नांव पाहा त्या लेखकाचं–बरंच चमत्कारिक नांव आहे. . .हो, आठवलं–कुमार मुडक्या रामा जाधव कृत 'संस्कृतीचा फांसा !'

**चंद्रकांत** : 'संस्कृतीचा फांसा' म्हणजे ?

**मुरली** : तें कुमार मुडक्या रामा जाधवला माहित ! नयना काम करीत होती म्हणून मुद्दाम गेलों. पण नाटकांतच दम नाहीं; ती काय करणार बिचारी !

**चंद्रकांत** : हीरो कोण होता ?

**मुरली** : मास्टर म्हाळसाकुमार. न् डायरेक्शन केलं. होतं मारुतिकुमारनं !

**चंद्रकांत** : नांवं ओळखीचीं वाटत नाहींत !

**मुरली** : रद्दी ! मेल्यांना खुर्चीवर बसायला येत नाहीं ! नक्कल पाठ नाहीं न् प्रत्येक वाक्य पाडीत होते ! चंद्रकांत, खरं सांगायचं तर हौशी मंडळांत राम नाहीं ! आपलं उगीच वादासाठी म्हणून म्हणायचं कीं रंगभूमी मात्र हौशी मंडळांनीं जीवंत ठेवली आहे !

**चंद्रकांत** : तुझं म्हणणं खोटं नाहीं. हौशी मंडळांत आज अभ्यासू कलाकार फार थोडे आहेत. कुणी तरी उठतो, चार माणसं कुठून तरी गोळा करतो; कुणाला तरी नाटक लिहायला सांगतो आणि नाटक लावतो ! लेखकाला इंग्रजी येत नाहीं, त्यानं अभ्यास केलेला नाहीं, तो एक अशिक्षित लेखक आहे हें हौशी कलाकारांत मोठं बहादुरीचं गमक समजलं जातं !

**मुरली** : खरंच, चंद्रकांत ! परवां एका नाटकाच्या मुहूर्ताचे वेळीं दोन चार हौशी नाटककारांनीं भाषणं केलीं, त्यांत त्यांनीं मोठ्या अभिमानानं हेंच सांगितलं–आम्ही अडाणी आहोंत, इंग्रजी चुकूनही वाचूं शकत नाहीं. आणि त्याहून आश्चर्याची गोष्ट म्हणजे, मोठमोठ्या साहित्यकांनी त्यांची त्याबद्दल पाठ थोपटली !

**चंद्रकांत** : नाटक हा विद्वानांचा प्रांत नाहीं; नाटक हें साहित्य नाहीं. नाटक हें दृश्य वाङ्मय आहे आणि त्याचं यश अपयश प्रयोगांच्या संख्येवर ठरलं पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. विक्षिप्तपणा हा थोर साहित्यकाचा गुण मानला तरी नाटक हें साहित्य नाहीं, आणि नाट्यलेखक विद्वान असतां कामा नये, असें जें विधान ह्या मोठ्या लोकांनीं केलें आहे, त्याबाबत मला मोठी शंका वाटते.

**मुरली** : काय हो चंद्रकांत, नाटक आणि तमाशा ह्यांत कांहीं फरक नाहीं असें जें म्हणतात त्यावर तुमचं काय म्हणणं आहे ?

**चंद्रकांत** : मुरली, कांही माणसं नाट्यतंत्राचे जाणते अभ्यासक आहेत; मराठी रंगभूमीविषयीं त्यांनीं पुस्तकेंही लिहिलीं आहेत. तेव्हां त्यांचीं मतं खोल विचारांतून आणि प्रत्यक्ष अनुभूतींतूनच प्रगटलीं असणार ! मी एक हौशी नाटककार ! मी त्यांच्यापुढं काय बोलणार ! हौशी रंगभूमीशीं माझा संबंध गेल्या दीड दोन वर्षांपासूनचा. अवघीं चार पांच नाटकें लिहून त्यांचे प्रयोग गिरणगांवांतून कसे तरी लावण्यापुरता ! मला त्यांची अनुभूति कशी असणार ?

**मुरली** : अनुभूति नसली तर ती घेतली पाहिजे. तमाशा काय आहे हें कोणी कोणी सांगतात म्हणून ग्राह्य कां म्हणून मानायचं ? तमाशा काय आहे हें जाणूं इच्छिणाऱ्यानं तो प्रत्यक्ष पाहून येऊन आपलं मत कां बनवूं नये ?

**चंद्रकांत** : मी तमाशा अजून पाहिलेला नाहीं. बघायची इच्छा आहे. पण...

**मुरली** : पण ?

**चंद्रकांत** : लिहिलेलीं छप्पन पुस्तकं आड येताहेत ! माझ्यासारख्या प्रतिष्ठित माणसानं तमाशा कसा काय बघायचा ?

**मुरली** : तशी लाजच वाटत असेल तर त्यालाही सोय आहे. रंगभूमीच्या आंत प्रतिष्ठित प्रेक्षकांना बसण्याची सोय सर्व थिएटरांतून असते. तिथं बसून आपल्याला तमाशा बघतां येईल !

**चंद्रकांत** : खरंच ? तिथून आपणाला कुणी बघूं तर शकणार नाहीं ना ?

**मुरली** : छे ! आंत जाण्याचा दरवाजा देखील मागच्या बाजूनं ! सारं काम गुपचूप !

**चंद्रकांत** : गुपचूप ! मग मुरली, जाऊं या आपण एक दिवस गुपचूप तमाशाला ! अं ?

**मुरली** : एक दिवस ? एक दिवस कां ? आज जाऊं या. आज विठाची बारी मिळेल !

**चंद्रकांत** : बारी ? [ घाबरून ] छे छे ! हें पाहा, तशी बारी बिरी नको अं !

**मुरली** : ऑ ?—बारी म्हणजे काय वाटलं तुम्हांला ? पक्के लेखक आहांत झालं ! अहो, बारी म्हणजेच तमाशा !

**चंद्रकांत** : तसं असलं तर मग ठीक आहे. पण—

**मुरली** : पण काय ? घरीं ताई वाट पाहतील होय ?

**चंद्रकांत** : छे छे ! तशी तिला संवय आहे. माझं जेवण झांकून ठेवून ती सरळ झोपून जाईल ! मी आपला रोज रात्रींचा एक दोनच्या पुढें जायचं, अंधारांत चांचपडून टोप वगैरे धुंडाळायचा, त्यांत सांपडेल तें चोरासारखं गिळायचं आणि गुपचूप तिच्या शेजारीं झोपून जायचं–हा आमचा रोजचा खाक्याच आहे ! पण...

**मुरली** : मग आणखी कुठला पण आला ! विटाची बारी बघूं या आज. ती होऊन गेली असली तर भिंगरीची बारी आहेच !

**चंद्रकांत** : भिंगरीची ?

**मुरली** : नवी पोर आहे ! काय फटाकडी आहे म्हणतां ! नुसती नाचतांना पाहिली कीं पैसे वसूल !

**चंद्रकांत** : तें झालं ! पण आज इथं पैशांचा पत्ता आहे कुणा लेकाजवळ !

**मुरली** : आपल्याला काय करायचेत पैसे !

**चंद्रकांत** : म्हणजे ?

**मुरली** : अहो मी 'रुमझुम्' मासिकाचा स्तंभलेखक नव्हे का ? 'रुमझुम' मधलं तमाशाचं सदर 'तात्या' ह्या टोपण नांवानं कोण लिहितो ?

**चंद्रकांत** : असं ? वा ! जिओ राजा ! मग आजच जायला हरकत नाहीं, पण गुपचूप अं !

**मुरली** : अगदी त्याची नको काळजी !

**चंद्रकांत** : मग जाऊं याच तर !—पण हें पाहा, त्या पत्रांतलं 'हौशी मंडळांचीं लफडीं कुलंगडीं' हें सदर तर नाहींस ना तूं लिहीत ? नाहींतर सरळ 'छप्पन पुस्तकांचा लेखक विटाची बारी बघायला गुपचूप गेला' असं लिहून मोकळे होणारे लोक तुम्ही !

**मुरली** : छे छे ! तसा मी एखाद्याचा विश्वासघात करणारा माणूस नाहीं अं चंद्रकांत ! अन् दोस्ताचा तर नाहींच नाहीं !

**चंद्रकांत** : अच्छा ! चला जाऊं या तर मग–विटीची बारी ! ठांसून झाली पाहिजे !! [ ह्याच वेळीं पडद्याआड ढोलकीचा कडकडाट ]

[ जातात : पडदा उघडतो : पुढील दृ य. ]

अंक १ ला  दृश्य ३ रें

[ लालबागमधील तमाशाचें थिएटर–मिंगरी आणि सुभान्या ह्यांची बारी चालू आहे. ढोलकीवाला, हलगीवाला: तुणतुणे आणि झांझवाले साथ करीत आहेत. मिंगरी नाचत आहे. सुभान्या आणि त्याचा सांगड्या तात्या समोर येऊन शाहिरी मुजरा करीत मागे हटून नाच थांबपर्यंत उभे राहात आहेत. नाच थांबवून मिंगरी रंगभूमीवर उजव्या कोपऱ्यांत 'पोझ' घेऊन उभी आहे. तात्या आणि सुभान्या आतां पुढें आले आहेत. उत्स्फूर्त भाषण करीत आहेत. साथवाले मागे हटून अधुन मधून वाद्यांची साथ देत आहेत. ]

**सुभान्या** : तात्या, मुंबई बघायला आलायस, रस्त्यानं जरा सांभाळून चाल—

**तात्या** : काय सांभाळून चालूं ?

**सुभान्या** : गाडी, घोडे, मोटरी, माणसं ! तें बघ–बघ पुढं !

**तात्या** : पांखरूं ? कुठंय पाखरूं ?

**सुभान्या** : अरे पांखरूं म्हणजे ती फटाकडी पोरगी बघ ! बघ...

[ लावणी गातो ]

**बिजली कशी ठुमकत ठुमकत जाती र ऽ**
**कान्या डोळ्यानं मजकडं पाहाती ॥ ध्रु० ॥**
**अंगांत चोळी अर्ध्याची**
**नाकांत नथ नथ सरग्याची**
**डोक्यामधीं वेणी मोगऱ्याची र ऽ ॥ १ ॥**
**मुरकते मुरड तोऱ्याची**
**नागीण चाल वाऱ्याची**
**मारा करते गहिऱ्या नजरेची र ऽ ॥ २ ॥**
**अशी ठुमकत ठुमकत जाती र ऽ**
**कान्या डोळ्यानं माझ्याकडं पाहती ॥**

**तात्या** : हाः ! सुभान्या ! पोर पण पोर हाय ! अशी पोर जर माझ्यासारख्याला बायकु असती तर–!

**सुभान्या** : हां ! तात्या, संभाळून अं ! मुंबई आहे–बायकांकडं साफ डोळ्यांनीं पाहिलं पाहिजे !–हें बघ, पुढं हो ! विचार तिला.

**तात्या** : काय विचारूं !
**सुभान्या** : कुठं राहाते ? काय करते ?
**तात्या** : आन् तिनं कडाड्कन् मुस्कटांत दिली ठिऊनशान् म्हंजे ?
**सुभान्या** : छे छे ! मुस्काटांत दिली तरी मी आहें ना इथं—तूं हो पुढं—
**तात्या** : जाऊंच म्हणतुंस ? बराय्– [ घसा साफ करून ] आहो बाई—
**भिंगरी** : काय रे मेल्या !—
**तात्या** : ए सुभान्या ! आरे ती लय कडक आवा दिसतीया !
**सुभान्या** : कडक नाहीं. तूं तिला बाई म्हणालास म्हणून ती बिघडली तुझ्यावर !
**तात्या** : अरं बाई नग तर काय आई म्हणूं तिला आतां ?
**सुभान्या** : अरे समजून सांग तिला.
**तात्या** : बराय् ! सांगतो समजून.
**सुभान्या** : काय सांगशील ?
**तात्या** : सांगीन, कीं माज्यावाणी फाकड्ं नवरा न्हाई मिळायचा तुला !
**सुभान्या** : हां ! तात्या, तसं नको सांगूं !
**तात्या** : मंग कसं सांगूं बापू !
**सुभान्या** : तिला म्हणावं, ग्वाल्हेरीचे श्रीमंत सरदार आले आहेत !
**तात्या** : ठीक आहे !...[ भिंगरी जवळ जाऊन ]...आहो !
**भिंगरी** : कां हो ?
**तात्या** : हाय हाय ! सुभान्याबापू ! अरं बोलली रं बोलली माणसावाणी !
**सुभान्या** : आतां सांग तिला, म्हणावं आले आहेत !
**तात्या** : आहो ? आले आहेत !
**भिंगरी** : कोण आले आहेत ?
**तात्या** : गाल्हुरीच्या मुंगसीपालटीचं मुकादम आले आहेत !
**भिंगरी** : कशाला आले आहेत ?
**तात्या** : मुंबईच्या मुंगसीपालटीचीं गटारं साफ कराया आले आहेत ?
**सुभान्या** : तात्या ! गाढवा, काय सांगतोस तिला ?
**तात्या** : बराबर सांगतुंया नवं बापू ?
**सुभान्या** : इकडं ये मूर्खा ! नीट ऐक : आतां तिला सांग, म्हणावं—ग्वाल्हेरीचे मोठे व्यापारी आले आहे.
**तात्या** : व्यापारी ?...बराय !...आहो...!

**भिंगरी** : कां हो ?

**तात्या** : आले आहेत !

**भिंगरी** : कोण आले आहेत ?

**तात्या** : व्यापारी आले आहेत !

**भिंगरी** : कशाचे व्यापारी आले आहेत!

**तात्या** : जळक्या लांकडांचे व्यापारी आले आहेत !

**सुभान्या** : तात्या, गधड्या; इकडं ये ! काय रे ! मी जळक्या लाकडांचा व्यापारी आहे होय ?

**तात्या** : न्हाई बापू !

**सुभान्या** : मग तिला कां सांगत होतास तसं ?

**तात्या** : बापू, प्वार जरा गुलजार दिसली म्हून बोलून गेलों !

**सुभान्या** : हें बघ, चूक करूं नकोस पुन्हां. ह्या वेळीं सोपं सांगतों. नीट सांग अं ?

**तात्या** : नीट सांगेन बापू ! काय सांगूं ?

**सुभान्या** : तिला म्हणावं, ग्वाल्हेरीचे मोठे नट आले आहेत.

**तात्या** : बराय !...नट, नव्हं बापू ?...आहो तुम्ही—

**भिंगरी** : कां हो तुम्ही ?

**तात्या** : आले आहेत—

**भिंगरी** : आहो, पण कोण आलेत ?

**तात्या** : ग्वाल्हेरीचे मोठे नट आलेत—

**भिंगरी** : कशाला आलेत ?

**तात्या** : बोलट शोधताहेत !

**सुभान्या** : तात्या गाढवा ! पुन्हां केलास घोटाळा ?

**तात्या** : आतां नट आलेत नव्हं बापू ?...नट आलेत !

**सुभान्या** : वेडा आहेस तूं तात्या. हें बघ, मी आतां जातों, मी आतां बोलतों. [ पुढें होऊन ] हे चतुर सुंदरी—

**भिंगरी** : काय म्हणतां सावकार ? कोण आपण ?

**सुभान्या** : मी कोण ? मी ग्वालेरीचा श्रीमंत सरदार आहे !

**तात्या** : [ स्वगत ] बगा ही दुन्या ! हा गधडीचा सुभान्या सरदार म्हून सांगतोय् ! आन् ती चिमणी त्याशीं चिंव चिंव करूनशान बोलती

**सुभान्या :**

ग्वालेरीचे आम्ही हौशी सरदार
मुंबईला आलों बनुन आम्हीं मुसाफिर
मस्त मदनाची मूर्ति तूं साकार
तुला पाहुन झालों आम्ही गारेगार
पुरेपूर ठार ग ऽ ॥ १ ॥
घन तमांत चमके बिजली
तशी तूं दिसली
काळजांत घुसली
गुंग मति झाली
प्रीत तुझ्यावर गऽ
ग्वाल्हेरी जाऊं चल आतां नाहीं ती दूर ग ॥

**भिंगरी :** सावकार, मी येतें तुमच्याबरोबर. आहो राव—

**तात्या :** तात्या म्हणत्यात मला, तुम्ही जिवा म्हनलांत तरी चालेल !

**भिंगरी :** तात्याच तुम्ही माझेही ! सरदारांना विचारा, तुमची ग्वाल्हेरी आहे कशी ? तुमचा वाडा आहे कसा ?

**तात्या :** आहो बाई, कुठला वाडा ?—म्हारवाड्यांत ऱ्हातोंय्‌ ह्यो सुभान्या !

**सुभान्या :** हां तात्या !—सुंदरी, एक—

माझ्या ग वाड्याला दारं तीनशेंसाठ
चौपाळे टांगले ठोकून कडीपाट
पंखे वारायला दासी तीनशेंआठ
गाणीं गातीं लोक कवि आणि भाट
असा माझा थाट ग ऽ ॥

**भिंगरी :** तात्या—खरं कां हो हें सारं ?

**तात्या :** तर तर ! [ स्वगत ]—कुडाच्या भिंताडाला तिनशेंसाठ भोकं हायेतंच ! वाराबी हाय ! जुमीन खडग्याची, तवां खालची बैठक बी हालती झोपाळ्यावाणी; आन्‌ चिलटं गात्यात्‌ गाणी !

**भिंगरी :** तात्या, सरदारांना विचारा, तिकडं खायाप्यायाचं कसं काय ?

**तात्या :** चांगलं ! मला मंधल्यामधीं करा टपाल्या !—

**सुभान्या :** तात्या, बिजलीला सांग,—[ गातो ]

**वरती नारळीं तिच्या खालीं केळीं**
**दुधाचीं तुपाचीं ग्वाल्हेरीला तळीं**
**शिरापुरी तिकडं उतरत नाहीं गळीं**
**बुंदी भिकाऱ्याला भरून ओंजळीं**
**पेढं बर्फी पायदळीं ग ऽ ॥**

**भिंगरी** : एऽ तात्या, खरं का हो हें ?

**तात्या** : तर तर ! [ स्वगत ] वरतीं नारळी म्हणजे नारळाची नरोटी ! तिच्या खाली केळी म्हणजे पाण्याचं मडकं ! दुधातुपाचीं तळीं मातुर म्यां काई पाहिलीं न्हाईतीं—पर असत्यालः आमास्नी कान जाऊं देतंया ततं ! पेढं न् बर्फी पायदळी हायेत. पाय भरला का धुवून टाकायचा नाक दाबून धरून !

**भिंगरी** : मंग तात्या, सरदार साहेबांना सांगा, मी येणार ग्वाल्हेरला तुमच्या ! [ गाते ] [ लावणी चालू असतां दौलतजादा ]

**अरबी घोड्यावरती ग स्वारी । करूं या मुसाफरी ॥**
**मुसाफरी ऽ राया जी जी र जी ॥ ध्रु० ॥**
**छंदी मुसाफिर न्या मज ग्वाल्हेरीं ।**
**चौफेर घोडा दौडा मजा आणा न्यारी न्यारी**
**मुसाफरी ऽ राया जी जी र जी ॥**
**नाजुक माझी कवळी काया ॥**
**सांभाळुन मज ने रे राया ऽऽ ॥**
**अजुन कुठल्या घोड्यावरती नाहीं स्वारी**
**राया माझी झाली नाहीं स्वारी । मुसाफरी० ॥**

[ लावणी संपवून सुभान्या तात्यासह भिंगरी आणि साथीदार उजव्या बाजूच्या विंगमधून आंत जातात. डाव्या बाजूनं चंद्रकांत आणि त्याच्या पाठोपाठ मुरली येतो. ]

**चंद्रकांत** : मुरली...मुरली...!

**मुरली** : चंद्रकांत ! इकडून रस्ता नाहीं ! हा तमाशाचा स्टेज आहे. माणसं बघतील ना तुम्हांला !

**चंद्रकांत** : माणसं ? कुठं आहेत माणसं ? मुरली, इथं—इथं—इथं नुसती ती भिंगरी दिसतेय् रे मला !

**मुरली** : भिंगरी ?

**चंद्रकांत** : भिंगरीसारखी नाचतेय् ! देहभान विसरायला लावतेय रे माणसांना ती ! –मुरली, तिचं गाणं–तिचं गाणं म्हणजे मोहळांतून पाझरणारा मध आहे रे नुसता !
**मुरली** : पण चंद्रकांत, आग्या मोहोळ आहे हें ! सांभाळ, नाहीं तर डंख बसतील !
**चंद्रकांत** : इतका गोड मध मिळणार असला तर कोण करतो डंखांची पर्वा !– हाय ! भिंगरी ! तिच्या गाण्यावर पागल बनून लोकांनीं तिच्यावर दौलतजादाची खैरात केली ! पण मी ?–मुरली, तुझ्याजवळ नोटा आहेत का रे ?
**मुरली** : नोटा ? त्या कशाला ?
**चंद्रकांत** : कशाला ! ह्या भिंगरीवरून ओवाळून टाकायला ! मुरली ! निदान पांच रुपये तरी उसने देशील मला ?
**मुरली** : चंद्रकांत, वेड्यासारखं काय करतां ? एवढे मोठे लेखक तुम्ही ? छप्पन पुस्तकांचे कर्ते ! एका मामुली नाचणारणीला पाहून असे पागल बनतां ?
**चंद्रकांत** : मामुली नाचणारीण ! मुरली ! नको रे असं कठोर बोलूं भिंगरीबद्दल ! ती–ती श्रेष्ठ कलावंत आहे ! कलेपुरता तिचा दर्जा विचारांत घे ! तिच्या खाजगी जीवनाविषयीं विचार करूं नकोस ! ऐक ! परवां कोंकणच्या नाटककारांचें संमेलन भरलं, त्या वेळी स्वागताध्यक्षांनीं भाषण केलं; त्यांत काय सांगितलं तें आठव ! 'कलावंताचं शील कसं आहे तें पाहूं नका, त्यांची कला कशी आहे ती पाहा !' अहाहा ! भिंगरीची कला ! मुरली ! एक दोन नोटा उसन्या दे रे मला !
**मुरली** : अहो चंद्रकांत, लोक हंसताहेत हो आपल्याला पाहून ! चला लौकर !
**चंद्रकांत** : लोक ? कुठं आहेत लोक मुरली ? कां हसताहेत ते ! तमाशा बघायला आपण आलों आहोंत म्हणून ? हंसूं दे ! तमाशांत आणि नाटकांत मुळींच फरक नाहीं ही माझी खात्री पटली आहे. मुरली, एक प्रश्न विचारतों तुला–खरं मत सांगशील तूं तुझं मला ?
**मुरली** : कसला प्रश्न आहे आतां ?
**चंद्रकांत** : मी–मी तमाशा करूं कां रे ?
**मुरली** : चंद्रकांत—!

[ मुरली आ वासून बघत राहतो

**चंद्रकांत** : हो हो ! मी तमाशांत जाणार ! तमाशा करणार !

[ ढोलकीचा पडद्याआड कडकडाट.

## पहिला अंक समाप्त

[ भिंगरीचें घर. भिंगरी आरशासमोर केस विंचरीत उभी आहे. एकीकडे लावणी गात आहे. दरवाजांतून चंद्रकांत उभा असलेला दिसतो. गाण्याच्या मस्तींत तो डोलत देहभान विसरून जागींच उभा आहे ! चंद्रकांतकडे भिंगरीचें मात्र लक्ष नाहीं.

**भिंगरी :** [ गाते ]

**असा खट्याळ ग । नंदाचा गोजिरवाणा । बाई कान्हा ॥ ध्रु० ॥**
**लपुनी छपुनी हळूंच येतो । मारी खडा अन् चोरून पाहतो**
**दह्या दुधाचें स्नान घडवितो ।**
**असा खट्याळ खट्याळ खट्याळ ग ।**
**असा खट्याळ ग । बाई खट्याळ ग ॥ १ ॥**
**मधु वाजवी मंजुळ मुरली । मुरली–नादें अवनि हरपली**
**असा खट्याळ खट्याळ खट्याळ ग ।**
**असा खट्याळ ग बाई खट्याळ ग ॥ २ ॥**

**चंद्रकांत :** [ टाळी वाजवून ] वन्समोर ! वन्समोर ! !

**भिंगरी :** [ चमकून ] आपण कोण हो ?

**चंद्रकांत :** मी ?–[ आंत येऊन ] मी कलेचा सेवक ! रंगदेवतेचा पुजारी !–मी–मी–आलों आहे–कारण इथं कला आहे—

**भिंगरी :** वाट चुकलांत सावकार आपण ! इथं कला नांवाची कोणी बाई राहात नाहीं–देवताही नाहीं. इथं मी राहातें–तमाशांत नाचणारी नायकीण आहे मी ! माझं नांव आहे भिंगरी !

**चंद्रकांत :** भिंगरी ! तुम्हीच पाहिजे होता मला ! रात्रीं तमाशाला आलों होतों मी ! तुम्हांला बघावं, पुन्हां भेटावं म्हणून मुद्दाम आलों आहे !

**भिंगरी :** मला बघायचं–भेटायचं हें ठिकाण नाहीं सावकार. सरळ थेटरांत आज रात्रीं आला असतां तरी दिसलेंच असतें मी ! रोज बारी असते माझी !

**चंद्रकांत :** [ गडबडून ] छे–छे !–तसं म्हणजे नुसतं बघायला नाहीं आलों मी तुम्हांला—

**भिंगरी :** मग हो ?

**चंद्रकांत :** माझं एक बरंच महत्त्वाचं काम होतं तुमच्याकडं.

**भिंगरी** : असं होय ? मग बसा ना–बसा–आलेंच हं मी !

[ उजव्या बाजूला जायला वळते

**चंद्रकांत** : हें पाहा, कुठं निघालांत ? थांबा ना. माझं काम मी सांगतों आधीं !

**भिंगरी** : आपलं काम ओळखलंय मीं ! येतेंच मी एवढ्यांत !

**चंद्रकांत** : काम ओळखलं ?–म्हणजे ? कसं ओळखलं ?

**भिंगरी** : मला लोकांचीं मनं ओळखायची विद्या माहीत आहे–

**चंद्रकांत** : असं ? नवल आहे !–मग ?

**भिंगरी** : मग काय ? जरा धीर धरा म्हणतें मी ! दुसरं काय ?

**चंद्रकांत** : हां हां–असं होय ! ठीक आहे. मला पुष्कळ धीर आहे ! सावकाश होऊं दे !

[ भिंगरी मस्त हसते–तो आंग चोरून गोंधळतो. भिंगरी पान पुड्याकडे जाते. पान तयार करते. पान करतां करतां चोरून बघून हसते. चंद्रकांतचें आयस्क्रीम होतें. भिंगरी पट्टी तयार करून ठुमकत ठुमकत चंद्रकांतपुढं पान करते. ]

**चंद्रकांत** : प्–पान नकोय मला ! पान खात नाहीं मी !

**भिंगरी** : [ त्याला खेटून बसत ]—माझं पान नाकारणारा पुरुष भेटला नव्हता अजून मला–आंग कशाला चोरतां ?–इतके लाजाळू पुरुष मी अजून कधीं पाहिले नव्हते !

**चंद्रकांत** : [ दूर सरत ] त्याचं असं आहे, मी इतर पुरुषांसारखा आहे, असं समजूं नका !

**भिंगरी** : अगबाई ! म्हणजे हो ?

**चंद्रकांत** : तेंच तें ! इतर पुरुषांसारखा मी नाहीं !

**भिंगरी** : च्–च्–च !

[ निराशेनें बाजूला सरते ]

**चंद्रकांत** : [ गडबडून ] —आहो, म्हणजे गैरसमज झालाय् कीं काय तुमचा ? –तसा मी इतर पुरुषांसारखाच पुरुष आहे ! [ ती पुन्हां जवळ सरते ] पण– [ ती आ वासून ऐकते ] पुरुष असलों तरी एक फार प्रसिद्ध लेखक आहे मी ! –संस्कृति आड येते ना !

**भिंगरी** : म्हणजे ? लग्न झालंय् आपलं ? मग इकडं कशाला आलांत ?

**चंद्रकांत** : तेंच सांगायला—!

**भिंगरी** : तुमचं लग्न झालंय तें सांगायला ? मला काय करायचं त्याच्याशीं ?

**चंद्रकांत** : तुम्हांला करायचं आहे–म्हणून तर मी आलों आज ! ऐका–ऐका हो ! गैरसमज करून घेऊं नका–मी तुमची ती कला पाहिली—

**भिंगरी** : अहो वेड लागलं कीं काय तुम्हांला कुणाचं ? सांगितलं ना इथं कुणी कला बिला नाहीं म्हणून !

**चंद्रकांत** : म्हणजे कला ही कुणी बाई बिई आहे असं समजतां कीं काय तुम्ही ?–कमाल आहे ! अहो कला म्हणजे अभिनय कला, म्हणतों मी ! मराठमोळा रंगभूमीवर जी कला तुम्ही दाखवतां ती म्हणतों मी ! ऐका–मी एक थोर कलावंत आहे ! छप्पन पुस्तकांचा लेखक आहे. हौशी रंगभूमीवर गाजलेला नाटककार आहे ! आणि मला तुमच्या सहकार्याची आवश्यकता आहे !

**भिंगरी** : म्हणजे काय ?

**चंद्रकांत** : मी कल्पना आहे; तुम्ही मला साकार करा. मी देह आहे, तुम्ही आत्मा बना. मी द्रष्टा आहे. तुम्ही प्रतिभा बना !

**भिंगरी** : म्हणजे नाटकांत काम करूं म्हणतां हो तुमच्या ? असं असं ! पण हें पाहा, मी तमाशांतली नायकीण आहे. नाटकांत अजून काम केलेलं नाहीं मीं !

**चंद्रकांत** : नाटक नाहीं ! तमाशाच करूं आपण यापुढं !

**भिंगरी** : म्हणजे तमाशेही करतां वाटतं तुम्ही ? पण मग नांव कसं ऐकलं नाहीं मीं तुमचं अजून ?

**चंद्रकांत** : माझं नांव नाटककार चंद्रकांत !

**भिंगरी** : तमाशांत सोंगाड्याचं काम तुम्हीच करणार आहांत कां हो ? तसं असलं तर माझी बाई एका पायावर तयारी आहे तुमच्या तमाशांत यायची ! बोला, काय देणार मला तुम्ही ?

**चंद्रकांत** : एका पायावर तयारी आहे तुमची ? तसं असलं तर तुमच्या मनाखातर सोंगाड्याचंच काय तुम्ही सांगाल ती भूमिका करायला मी तयार आहे ! आपण सारा महाराष्ट्र गाजवून सोडूं. रंगभूमीवर क्रांति करून सोडूं ! वर्तमानपत्रांतून आपले फोटो येतील. घराघरांत आपल्या नांवांची चर्चा सुरूं होईल ! मी कोण आहे माहीत आहे ? छप्पन पुस्तकांचा लेखक आहे मी ! अशा झकास लावण्या लिहीन, असे संवाद लिहीन कीं आम जनता डोलत राहिली पाहिजे नागासारखी !

**भिंगरी** : म्हणजे ? तुम्ही कवि देखील आहांत हो ?

**चंद्रकांत** : कांव ? कवीच काय, मी लेखक आहे, नट आहे, गायक आहे ! मी छप्पन पुस्तकांचा लेखक आहे ! आणि आतां...आतां मी तमासगीर होणार ! कारण नाटकांत आणि तमाशांत कांहीं फरक नाही–पट्टीचे नाटककार, फर्डे टीकाकार आणि समीक्षक सांगत होते, तेंच खरं ! नाटकांत आणि तमाशांत कांहींच फरक नाहीं ! तमाशा हेंच महाराष्ट्राचं खरं नाटक आहे !

**भिंगरी** : असं जर तुम्ही तमाशांत बोललांत तर सारं गिरणगांव बाई पागल होईल ! तुम्ही काढाच तमाशा ! आपण यायला एका पायावर तयार आहोंत ! अशा सोंगाड्याबरोबर काम करण्यांतच खरी रंगत चढणार !

**चंद्रकांत** : ठरलं तर मग ! मी आतां जातों, आणि माझ्या पहिल्या बारीचे संवाद लिहून काढतों—

**भिंगरी** : संवाद म्हणजे लावण्या जुळतां होय ?

**चंद्रकांत** : लावण्याही जुळतों आणि डायलॉग पण !

**भिंगरी** :—आणखी काय म्हणालांत ?

**चंद्रकांत** : बारीत पात्र जी भाषणं बोलतात ती ! नकला पाठ करायच्या वाचून न् बोलायचं !

**भिंगरी** : [ तोंड वांकडं करून ] तें नाहीं जमायचं बाई !

**चंद्रकांत** : कां ग ?–[ जिभ चावून ]–म्हणजे कां हो म्हणालों मी !

**भिंगरी** : मला अग तुग म्हणालांत तरी चालेल–सारी जणं तेच म्हणतात मला. तुम्ही कुणी परके नाहींत !

**चंद्रकांत** : पण माझी संस्कृती आड येते ना–अगं तुगं म्हणून कसं चालेल !

**भिंगरी** : बायकोला बरेच भितां का हो तुम्ही ?

**चंद्रकांत** : म्हणजे ? तुला कसं समजलं ?

**भिंगरी** : मघांपासून तुम्हीच त्यांचं संस्कृति संस्कृति असं नांव नाहीं वाटतं घेत ! भारीच विनोदी स्वभाव आहे बाई तुमचा !

**चंद्रकांत** : ऑं ? म्हणजे संस्कृति हें माझ्या बायकोचं नांव आहे असं समजतां कीं काय तुम्ही ?–अहो भिंगरीबाई, संस्कृति ही बायको नव्हे माझी !

**भिंगरी** : [ लाजून ] इश्श ! भिंगरीबाई काय ?–नुसतं भिंगरीच म्हणा ना मला !

**चंद्रकांत** : छे छे! मला तुम्ही असा तसा, इतर पुरुषासारखा समजूं नका अं ! मी सुसंस्कृत आहे ! छप्पन पुस्तकांचा लेखक आहे ! एकदां आणून देईन तुम्हांला मी माझीं सारीं पुस्तकं !

**भिंगरी** : कशाला ?

**चंद्रकांत** : कशाला म्हणजे ? वाचायला !

**भिंगरी** : नको ! कशाला उगीच !

**चंद्रकांत** : नाहीं नाहीं, नको काय म्हणून ! निदान नाटकाचीं तरी पुस्तकं तुम्हीं पाहिलींच पाहिजेत माझीं !–संकोच करायचं कारण नाहीं ! मी अशीं कॉम्पलीमेंटरी पुस्तकं देतच असतों आपल्या माणसांना ! बरं असतं तें ! आपल्या नाटकांची जाहिरातहि होते, शिवाय आवृत्त्यावर आवृत्त्या छापायची संधी मिळते माणसाला !

**भिंगरी** : अहो, पण मला वाचतां येत नाहीं. तुमचीं पुस्तकं घेऊन मी करूं काय ?

**चंद्रकांत** : वाचतां येत नाही ? मग बारींतलं भाषण कसं पाठ करतां ?

**भिंगरी** : कुणी सांगितलं आम्ही वगाचं भाषण पाठ करतों म्हणून ? आम्ही मनाला येईल तसं धोरण बघून बोलतों !

**चंद्रकांत** : बापरे ! म्हणजे, उत्स्फूर्त भाषण करतां की काय सारं ?

**भिंगरी** : काय म्हणालांत ?

**चंद्रकांत** : मनाला सुचेल तें बोलतां कीं काय ?

**भिंगरी** : तुमच्या तमाशांत कसं बोलतात ?

**चंद्रकांत** : माहीत नाहीं ! पाहूं आतां आपण तमाशा काढूं तव्हां.

**भिंगरी** : हो, पण तें मघां राहूनच गेलं. तुम्ही मला पगार काय देणार ?

**चंद्रकांत** : आम्ही नटीला पन्नास रुपये नाईट देतों; पाऊणशेंही देतों चांगल्या नटीला–तुम्हांलाही तितकी देऊं !

**भिंगरी** : काय, पाऊणशें रुपये ? कमी होतंय हो फार ! मला सुभान्या त्याच्या तमाशांत दीडशें रुपये देतो !

**चंद्रकांत** : दीडशें रुपये ! बापरे ! फार होतंय् हो !

**भिंगरी** : महिन्याला दीडशें रुपये फार झाले ?

**चंद्रकांत** : म–महिन्याला ?–मला वाटलं नाईटला !

**भिंगरी** : नाईटला म्हणजे ?

**चंद्रकांत** : नाईटला–! [ जीभ चावून ] आठवड्याला ! इंग्रजी शब्द आहे ! नाईट म्हणजे आठवडा ! सात दिवस ! !

**भिंगरी** : मग सात दिवसाला तुम्ही नटीला पन्नास रुपये देतां, महिन्याला दोनशें होतात त्या हिशोबानें ! दोनशें रुपयांत मी उद्या मारीत येईन कीं !

**चंद्रकांत** : पण तुम्ही दीडशें म्हणालांत—पण हरकत नाहीं, दोनशें तर दोनशें ! ॲडव्हान्स किती तें बोला !

**भिंगरी** : काय म्हणलांत ? मराठींत बोला ना हो !

**चंद्रकांत** : ॲडव्हान्स म्हणालों मी ! ॲडव्हान्स म्हणजे मघांशीं तुम्ही ती पानपट्टी मला देत होतां, ती द्या आतां म्हणजे बोली पक्की झाली !

**भिंगरी** : तुम्ही पान खात नाहीं म्हणालांत ना ?

**चंद्रकांत** : नटी ठरवतांना, ॲडव्हान्स देतांना—म्हणजे द्यायचं कांहीं नाहीं—बोली पक्की करतांना खातों मी पान ! ती रीत आहे आम्हां नाटकी लोकांची !

**भिंगरी** : बरं तर देतें अं पान तुम्हांला—[ पट्टी तयार केलेली पानपुड्यांतून आणतें. हं ! घ्या—

**चंद्रकांत** : बोली पक्की करतांना तोंडांत पान घालायची रीत आहे !

**भिंगरी** : संस्कृति आड येत नाहीं ?

**चंद्रकांत** : छट् ! मुळींच नाहीं ! संस्कृतीच आहे ही !

[ त्याच्या तोंडांत ती नखऱ्यांत पान देतें

[ पडदा पडतो. पुढील दृश्य ]

---

अंक २ रा  दृश्य २ रें

[ गिरणगांव : तोच दिवस : प्रकाश आणि मुरली रस्त्यानें बोलत येतात. ]

**मुरली** : चंद्रकांत वल्ली आहेत हें मला माहीत होतं. पण त्यांच्या विक्षिप्त-पणाचा रात्रीं कळस झाला !

**प्रकाश** : अच्छा ? कळस झाला अं ?

**मुरली** : आहो, मला लाज वाटूं लागली. ती भिंगरी आणि तिचे ते साथीदार आंत गेले मात्र चंद्रकांतची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. बसल्या ठिकाणांतून ते उठले. आणि भिंगरी भिंगरी असं करीत पुढं झाले !

**प्रकाश** : असं अं ?

**मुरली** : मी त्यांना म्हणालों, चंद्रकांत, अहो लोक बघताहेत हो आपल्याला ? असं वेड्यासारखं काय करतां हें...तर म्हणे, ' मुरली, मला लोक दिसत नाहींत

रे ! मात्र भिंगरी दिसतेंय मला ! मात्र भिंगरी ! !' मी म्हणतों, प्रतिष्ठित माणूस हा...

**प्रकाश** : मुरली, जगांत फसव्या जीवनालाच प्रतिष्ठा हें गोंडस नांव प्राप्त झालं आहे ! प्रतिष्ठा ! काय असते ही प्रतिष्ठा ? प्रतिष्ठा म्हणजे फसवणूक ! प्रतिष्ठा म्हणजे लपंडाव ! प्रतिष्ठा म्हणजे जगाच्या डोळ्यांत फेंकण्याची धूळ !

**मुरली** : पण चंद्रकांतची प्रतिष्ठा इतकी फसवी, अशी बेगडी आणि उघडी नागडी असेल ह्याची मला कल्पना नव्हती ? मी म्हणतों छप्पन पुस्तकांचा लेखक हा...!

**प्रकाश** : लेखक झाला तरी तोही माणूसच असतो ! चंद्रकांत मला छंदी माणूस दिसतो !

**मुरली** : चंद्रकांत कसेही असले तरी पण त्यांची पत्नी सालस बाई आहे ! जितकी भोळी भाबडी तितकीच बिचारी प्रेमळ आणि सरळ ! त्या साध्वी बाईला मात्र ह्या साऱ्या प्रकारामुळं मनोयातना सहन कराव्या लागतील !

**प्रकाश** : मनोयातना ? नुसत्या मनोयातनाच कां ? देहयातनाही सहन कराव्या लागतील तिला ! तुमच्या सर्व सांगण्यावरून हें सारं स्पष्टच होत आहे !

**मुरली** : काय समजावं तेंच कळेनासं झालं आहे. बिचारी फारशी शिकलेली नाहीं. बुद्धीनंही जेमतेमच. पण स्वभावानं सरळ आणि मनानं मोठी आहे ! त्यागाची मूर्तिमंत प्रतिमा आहे !

**प्रकाश** : मी का त्या बाईना ओळखीत नाहीं, मुरली ? अगदीं कालचीच हकीगत आहे. त्यांचं 'लाल राज्य' नाटक आमच्या क्लबतर्फे रंगभूमीवर बसवावं म्हणून परवानगी विचारायला मी काल त्यांच्या घरी गेलों. पण बिचारीला नवऱ्याचा इतका जहाल अभिमान, कीं पंधरा रुपये मोबदला द्यायला मी तयार असतां तिला तेवढ्यावरून माझा राग आला !

**मुरली** : राग आला ?

**प्रकाश** : आपला नवरा म्हणजे प्रति गडकरी आहे असा त्या भाबड्या बाईचा समज दिसला. पंधरा रुपये मोबदला घेऊन नवऱ्याचं नाटक परक्या क्लबला बसवायला देण्यांत कमीपणा वाटला तिला ! मी म्हणतों, चंद्रकांत हा बोलून चालून एक हौशी लेखक...

**मुरली** : पण इतर हौशी लेखकाप्रमाणें त्यांना माजण्याची तुम्ही चूक तर करीत नाहीं ना प्रकाश !

**प्रकाश** : हौशी आणि धंदेवाईक हे भेद माझ्याजवळ नाहींत मुरली ! मला जीं नाटकं स्वस्तांत पडतात, आणि जास्तींत जास्त नफा मिळवून देऊं शकतील अशीं वाटतात, तीं नाटकं मी घेतों—आतां ह्यांत धंद्याची दृष्टी आहे हें मी कबूल करतों. पण तशी दृष्टी न ठेवून कसं चालणार ! प्रयोगासाठी आम्हांला रुपये मोजावे लागतात !

**मुरली** : पण नाटक लिहायला लेखकाला देखील श्रम पडतात. त्यांना नको कां त्यांच्या श्रमाचा मोबदला मिळायला ?

**प्रकाश** : हा प्रश्न ज्याच्या त्याच्या मताचा आहे, मुरली ! चंद्रकांत कसलेला लेखक असेल, पण त्यानं नाटकं लिहिलीं किती ? आणि तीहि केव्हां ? नुसतं शिंगं मोडून वासरांत घुसून कां कोणी नाटककार होऊं शकतो ?

**मुरली** : नाटककार झालेलं बरं हो ! पण ते आतां तमाशांत जातों म्हणताहेत त्याचं काय ?

**प्रकाश** : भिंगरीची हकीकत तुम्हीं मला आधीं सांगितली नसती, तर आमच्या चंद्रकांतांनीं हा नुसता जाहिरातीचा स्टंट केला असं मीं समजलों असतों. पण आतां मात्र निराळं समजण्याखेरीज गत्यंतर नाहीं !

**मुरली** : प्रकाश, आपण त्यांचे स्नेही ! हा त्यांचा होणारा अधःपात आपण टाळूं शकणार नाहीं कां ?

**प्रकाश** : मस्तीनं वेडावलेला माणूस आणि माजलेला रेडा ह्यांत कांहींच फरक नसतो. टेंच लागून डोळे पांढरे होईपर्यंत अशा माणसांना शुद्धी येत नाहीं. आपण काय करूं शकणार ? जो तो आपल्या मौतेनं मरतो आहे !

**मुरली** : मला तसं वाटत नाहीं. चंद्रकांतची मती चळली असेल; पण तरी त्यांचा कायमचा अधःपात होणार नाहीं ! माझ्या मनाला त्याबाबत आशावाद वाटतो.

**प्रकाश** : मुरली ! एवढे भावनाप्रधान तुम्ही असाल असं मला वाटलं नव्हतं.

**मुरली** : तमाशाच्या थिएटरचा रस्ता मीं त्यांना दाखवला. त्यांना तिकडं फिरण्याची लाज वाटत होती. ते आतां तमाशांत जाण्यापर्यंतची भाषा बोलूं लागले आहेत...मीच ह्याला कारणीभूत झालों !

**प्रकाश** : मुरली ! अहो मी तुम्हांला चांगला शहाणा माणूस समजत होतों हो ! पण तुम्ही देखील चंद्रकांतप्रमाणं डोक्यानं जरा हे दिसतां !

**मुरली** : नाहीं, प्रकाश ! रात्रींच्या त्या प्रकारापासून माझ्या मनाला चैन नाहीं !

चंद्रकांतांचा स्वभाव अगदी हेकेखोर आहे. ते तमाशांत जाणार म्हणताहेत म्हणजे जाणारच !

**प्रकाश** : तुम्ही म्हणतां तसं झालं तरी तमाशाला एक चांगला सरदार प्राप्त होईल. तमाशांत क्रांति घडेल. अमंगलांतून मंगल बाहेर पडेल ! असं समाधान मानून कां घेत नाहीं ?

**मुरली** : समाधान मानून घेणं आणि समाधानी असणं, ह्यांत जमीनअस्मानाचं अंतर आहे प्रकाश !

**प्रकाश** : पण तुम्ही आतां करणार काय !

**मुरली** : प्रयत्नांची शिकस्त करीन, पण चंद्रकांतांना त्या उकिरड्यावरून खेचून रंगभूमीवर घेऊन येईन !

**प्रकाश** : स्तुत्य ! आशावादी आहांत ! मला आशावादी माणसं नेहमींच आवडतात. मी त्यांना मदतही करतों. तुम्हांलाही मी मदत करीन...त्या समोरच्या हॉटेलांत चला–तिथं पुढचा बेत ठरवूं.

[ जातात

पडदा उघडतो.

---

## अंक २ रा  दृश्य ३ रें

[ पहिल्या अंकाच्या प्रवेशांत वर्णन केलेलं चंद्रकांतचं घर. वेळ सायंकाळीं चारची. चंद्रिका दुपारच्या जेवणासाठीं अजून न आलेल्या चंद्रकांतची प्रतीक्षा करीत फिरत आहे. ]

**चंद्रिका** : [ स्वगत ] चार वाजून गेले, अजून ह्यांचा पत्ता नाहीं. भुकेनं जीव नुसता व्याकळून गेलाय्. एकदां बाहेर पडले कीं ह्यांना भूक तहान–कशा, कशाची शुध्दी रहात नाहीं.

[ मुरली दरवाजांत उभा दिसतो.

**मुरली** : काय चाललंय ताई–? आहेत का लेखकमहाशय घरांत ?

**चंद्रिका** : घराची शुद्धि असेल तर ना त्यांना नाटकांपुढं ! सकाळीं चहा घेऊन गडबडीनं बाहेर पडलेत, अजून पत्ता नाहीं.—

**मुरली** : कुठं गेले ते सांगून गेले नाहींत ?

**चंद्रिका** : कोण भिंगरी म्हणून नवी नटी शोधून काढली आहे म्हणत होते, तिला भेटायला गेले आहेत ! खिशांत नाहीं दमडी न् पुन्हां नव्या नाटकाचा चौघडा !

**मुरली** : [ चमकून ] भिंगरीच्या घरीं गेले आहेत ?

**चंद्रिका** : भिंगरी असंच नांव घेतलं बाई त्यांनीं. मला मेल्या त्या नट्यांची नांवं देखील आतां लक्षांत राहात नाहींत !

**मुरली** : प-पण ताई, भिंगरी नटी नाहीं...

**चंद्रिका** : मग कोण आहे ?

**मुरली** : भिंगरी–भिंगरी—

**चंद्रिका** : भिंगरी–भिंगरी काय करतां भावोजी ! सांगा ना भिंगरी कोण ती ?

[ चंद्रकांत गडबडीनं प्रवेश करतो

**चंद्रकांत** : अरे, कोण मुरली ? केव्हां आलास ?

**मुरली** : हा आतांच !

**चंद्रकांत** : बरं बैस हं, भूक लागलीय मला. जेवून घेतों प्रथम–[ चंद्रिकेस ] बघत काय उमी राहिली आहेस–वाढ, वाढ लौकर जेवायलॉं मला !

**चंद्रिका** : आठवण आहे म्हणायची जेवायची तुम्हांला ?

**चंद्रकांत** : केलीस का पुन्हां भांडणाला सुरुवात तूं ! जरा माणूस घरांत यायची खोटी. तुला तें बघवत नाहीं जसं ! बायको आहेस कीं कोण ?

**चंद्रिका** : बायकोच आहे. म्हणूनच विचारलं मीं तुम्हांला ! बायको असले तरी माणूस आहे मी. मला भूक लागते कीं नाहीं ?

**चंद्रकांत** : मग जेवूं नको म्हणून म्हणतो कोण तुला ? हजारदां सांगितलं, मला कामं असतात, तूं उगीच माझी वाट पाहात राहूं नकोस; आपली जेवून घेत जा. पण तुझं आपलं तेंच !

**मुरली** : अहो पण चंद्रकांत, तुम्हांला जेवायला यायला काय झालं वेळेवर ?

**चंद्रकांत** : आतां तुझी पाळी आली वाटतं ! तुम्ही दोस्त लोक म्हणजे एक आफत असते ! एखाद्याची बायको त्याला टाकून बोलली, कीं तुम्हांला अगदीं चेव येतो. लगेच त्यांच्या बाजूला फितूर होऊन त्यांच्या रागांत तेल ओतूं लागतां ! [ चंद्रिकेवर ओरडून ] अग जा ना आतां आंत, जेवायला वाढ मला !

**चंद्रिका** : ओरडूं नका, वाढतें जेवायला. एवढी भूक लागली होती तर लौकर

कां नाहींत आला? त्या भिंगरी का कुणी अगदीं कांही सुद्धां दिलं नसेल खायला ना!

**मुरली** : म्हणजे...चंद्रकांत! तुम्ही भिंगरीकडं गेलां होतां आज?

**चंद्रकांत** : हो! [चंद्रिकेस] जेवायला वाढ. [ती आंत जाते]–हो, भिंगरीच्या घरीं जाऊन भेटलों तिला आज!

**मुरली** : कशाला?

**चंद्रकांत** : कशाला? विसरलास तूं रात्रीं मी काय म्हणालों होतों तें?

**मुरली** : म्हणजे, खरंच तुम्ही तमाशा करणार कीं काय?

**चंद्रिका** : हो! चंद्रकांत नाटककार रात्रीं मेला! पार खलास झाला! आज रात्रीं माझा नवा अवतार मराठमोळा रंगभूमीच्या रसिकांना लालबागच्या थिएटरांत दिसणार!

**मुरली** : तुम्हांला वेड तर लागलं नाहीं चंद्रकांत?

**चंद्रकांत** : वेड! नाहीं, मला वेड लागलं नाहीं! आतां मला वेड लागलं नाहीं. इतके दिवस मात्र मी वेडा होतों. पैसे खर्चून नाटकं लावीत होतों आणि फुकट दाखवून खड्डयांत जात होतों मी इतके दिवस! कॅन्व्हसिंगसाठीं दारोदार फिरून प्रेक्षक गोळा करीत होतों आणि प्रत्येक प्रेक्षकागणीक करमणूक टॅक्सचा भूर्दंड सरकारच्या घशांत घालून संसाराचा उन्हाळा करीत होतो मी मुरली! पण आज मला कामधेनु सांपडली! भिंगरी मिळाली! आतां कॅन्व्हासिंगची गरज नाहीं: पैसे स्वतः खर्च करण्याची गरज नाहीं! आतां तुफान गर्दीत भिंगरी आणि चंद्रकांत ह्यांच्या बाऱ्या रोज झडणार! पैसा आमच्या पायाशीं लोळत येणार!

**मुरली** : चंद्रकांत, रागावूं नका अं माझ्यावर! पण असला कांहीं वेडाचार करून आपल्या पायावर धोंडा पाडून घेऊं नका तुम्ही! माझी ही मित्रत्वाची सल्ला आहे तुम्हांला!

**चंद्रकांत** : ए–ए मुरल्या; कां? दचकलास का? कुणाला सल्ला देतोयस तूं हा? मला? ह्या छप्पन पुस्तकांच्या लेखकाला?– बस! मला खुलासा नकोय्– रागावलों नाहीं मी तुझ्यावर!–भूक लागलीय मला. आलोंच मी जेवून. तोंवर तो 'शिलेदार' वाच! बौद्धिक मिळेल तुला त्यांत. आलोंच मी...

[गडबडीनें आंत जातोः

मुरली अस्वस्थ फिरत राहतो

**चंद्रिका** : [बाहेर येऊन] तुम्हीही चला ना भाऊजी!

**मुरली :** मी जेऊन आलोंय वहिनी ! भूक नाहीं मला.

**चंद्रिका :** आज तुमचा चेहरा उतरलेला दिसतोय् मला. प्रकृति बरी नाहीं का ?

**मुरली :** छे छे, प्रकृति ठीक आहे माझी !

**चंद्रकांत :** [ आंतून ] अग मीठं कां नाहीं ह्या भाजींत ? मीट दे मीट– इकडे ये !

**चंद्रिका :** चला ना भावोजी; तुम्हीही बसा, दोन घांस घ्या–

**मुरली :** जेवून आलोंय् मी वैनी. मला ख्ररंच नको !

**चंद्रिका :** मग आंत येऊन बसा गप्पा करीत.

**मुरली :** आंत नको, मी बसतों इथंच. तुम्ही जेऊन घ्या.

**चंद्रिका :** इथं एकटं काय कराल ?

**मुरली :** हा ' शिलेदार ' वाचीत बसेन.

**चंद्रकांत :** [ आंतून ] ए–अग येतेस कीं नाहीं ? मीट हवंय मीट मला—

**चंद्रिका :** अहो आलें मी: ओरडतां कशाला ?

**मुरली :** [ गातो [ राग–सोहनी ]

**रुमझुम रुमझुम बरसे मेहरवा**
**अब मै कैसे जाऊं घरवा ॥ ध्रु० ॥**
**एक डर है मोहे सास नणंदकी ।**
**दुजा जाग रहे देवरवा**
**एक तो दामनी कापनी लागत**
**दुजे वैरण रात भइलवा ॥ १ ॥**

[ गाणें संपल्यावर चंद्रकांत बाहेर येतो

**चंद्रकांत :** विंचु डसल्यासारखं ओरडायला काय झालं रे तुला ?

**मुरली :** ओरडत होतों मी ? किती अर्थपूर्ण भावमधुर गाणं होतं तें !

**चंद्रकांत :** गाणं ? ह्याला तूं गाणं म्हणतोस ? काय रे, गाणं कशाला म्हणतात ? संगीत म्हणजे काय ?

**मुरली :** संगीत म्हणजे काय ?

**चंद्रकांत :** हो, तूं स्वतःला संगीत गाणारा नट देखील समजतोस असं परवां 'वेणीं'तल्या मुलाखतींत त्या सूर्यवंशीला दडपून सांगितलंस. आतां मी तुला विचारतों, संगीत म्हणजे काय ? वेळीं अवेळीं तुझ्यासारखीं बदसूर माणसें कां

किंचाळत असतात? पोस्टाच्या पेटीसारखं तोंड करून उभा राहूं नकोस! तूं संगीत गाणारा नट आहेस?

**मुरली** : हें पाहा चंद्रकांत, चमत्कारिक प्रश्न विचारून माणसाला गांगरून सोडायचं हें तुमचं तत्त्व मला माहीत आहे! पण मी रात्रंदिवस तुमच्या सहवासांतला असल्यामुळं तुमच्या ह्या प्रश्नांचा भडिमारानं गांगरून जाईन असं समजूं नका. मी ठासून सांगतों, संगीत म्हणजे काय तें मला माहीत नाहीं, आणि तरी मी ठासून गातों! तुम्ही कोण हो आम्हांला कां गातां म्हणून विचारणारे?

**चंद्रकांत** : गैरसमज करून घेऊं नको मुरली! मीं हा प्रश्न तुझी परीक्षा घ्यावी म्हणून विचारला नाहीं...रात्रीं...रात्रीं आपण भिंगरीच्या वारीला गेलों, तमाशा पाहिला. मराठमोळा संगीत ऐकलं!...

**मुरली** : आतां ह्या प्रकाराला आळा घालणार आहांत की नाहीं तुम्ही चंद्रकांत?

**चंद्रकांत** : आळा? क्रांति करणार आहे मी आतां तिथं! मी आणि भिंगरी! भिंगरी आणि मी!

**मुरली** : चंद्रकांत! शुद्धीवर या–चंद्रकांत! तुम्ही कोण आहां? ताईचा विसर पडूं देऊं नका! त्यांची स्थिति काय होईल?

**चंद्रकांत** : मी रामजोशी बनणार! माझी बया भिंगरी!

**मुरली** : पण ताई?

**चंद्रकांत** : मी पठ्ठे बापुराव बनणार! माझी पौळी भिंगरी!

**मुरली** : आणि ताई?

**चंद्रकांत** : अरसिक माणसा, ताई ताईचा जप कां चालविला आहेस? तिला ह्यांत काय समजतं? कुठं कविची प्रतिभा भिंगरी आणि कुठ तुझी ताई चंद्री!

**मुरली** : चंद्रकांत!

**चंद्रिका** : [ बाहेर येऊन ] चालूं द्या, चालूं द्या त्या सटवीचं पुराण! कुठं मी खेडवळ बायको, आणि कुठं ती सर्वगुणसंपन्न सुंदर नटी! बोला, पुढं बोला—

**मुरली** : ताई, भिंगरी नटी नाहीं!

**चंद्रिका** : मग काय सती आहे?

**मुरली** : तमाशांत नाचणारी नायकीण आहे ती ताई!

**चंद्रिका** : नायकीण?–[ घाबरून ] अरे देवा! खरं हें?

**चंद्रकांत** : हो! अगदीं खरं! काय म्हणणं आहे तुझं? आजवर नाटकांतल्या

नटींबरोबर मीं माझा नाट्य–संसार केला, आतां भिंगरीबरोबर मराठमोळा रंगभूमी गाजवणार ! काय म्हणायचं आहे तुला !

**चंद्रिका** : [ रडत ] मला काय म्हणायचं आहे ?–काय म्हणायचं आहे तें कुठल्या भाषेनं, कुठल्या शब्दानं सांगू मी आतां ? माझ्यांतली प्रतिकार शक्ती ह्या घडीला लुळी पडली आहे ! सारं जग मला सुनं सुनं भासूं लागलं आहे !

**चंद्रकांत** : मुरली ! झालं होय तुमचं समाधान ? मग आतां उभे कां आहांत अजून ?

**मुरली** : अरे, म्हणजे म्हणतां काय ?

**चंद्रकांत** : आमचा सुखाचा संसार पाहवत नव्हता तुम्हांला; म्हणून संशयाचीं बीजं तुम्हीं माझ्या पत्नीच्या मनांत पेरलींत ! आमचा तो परस्पर श्रद्धेचा संसार ह्या क्षणीं तुम्ही उध्वस्त करून मोकळे झालांत. आणि वर मला हा प्रश्न विचारतां ?

**मुरली** : चंद्रकांत— !

**चंद्रिका** : भावोजी, कृपा करून त्यांना ह्यावर एक प्रश्नही विचारूं नका. आंखून दिलेल्या मार्गांतून भ्रमण करीत असलेला तेजस्वी तारा ज्या क्षणीं अपघात घडून निखळतो, त्या क्षणीं त्याच्या प्रचंड पतनास प्रारंभ होतो. चंद्रकांत आज अशी उल्का बनले आहेत ! वाट करून द्या. नाहीं तर त्यांच्या वेगवान् पतनाआड याल तर तुमच्या प्रेमाचा, सहानुभूतीचा, मायेचा चक्काचूर होईल !

**चंद्रकांत** : ढगाळलेल्या आकाशांत चंद्राचं शीतल चांदणं मंद झालेलं वाटलं, तरी चंद्र तो चंद्रच. उल्केची उपमा त्याला देणं हा त्यावर अन्याय आहे ! ढग विरले की माझी मंगलता जगाला आणि तुला समजून येण्यास उशीर लागणार नाहीं !

**मुरली** : चंद्रकांत, काय बोलतां हें ? विचार करून बोलतां का ? ताईकडं बघा, त्यांच्या डोळ्यांतले अश्रूं बघा. तुम्हांला त्यांचं कांहींच वाटत नाहीं ?

**चंद्रकांत** : वाटतं तर ! मला ते अश्रूं पाहून संताप वाटतो. माझ्या आयुष्यांतल्या प्रत्येक मंगल क्षणीं हिचे हे अश्रूं मी असेच पाहात आलों आहे, मुरली ! त्यांत नाविन्य वाटावं असं कांहींच नाहीं ! दहा वर्षांपूर्वी हिचं माझं लग्न झालं ! त्या वेळीं मी अवघे पंचवीस रुपडे मिळवणारा एक मजूर होतों. माणूस असून डुकरांचं जीवन जगत होतों आम्ही !

**चंद्रिका** : असं अभद्र बोलूं नका ! किती आनंदाचे दिसस होते ते ! आपण

गरीब होतों. भिकार चाळींत राहात होतों. पण आपल्या प्रेमानं त्या चाळीचं मंगल नंदनवन करून सोडलं होतं ! आपण किती किती सुखांत होतों त्या वेळीं !

**चंद्रकांत** : ऐकलंस मुरली ! पंचवीस रुपड्यांच्या संसारांत सुख मानणारी ही भिकार अवलाद— !

**मुरली** :—चंद्रकांत ! ऐकवत नाहीं हें आतां मला !

**चंद्रकांत** : मला तो जीवंत नरक वाटत होता. जीव जळत होता माझा ! मीं ती नोकरी सोडली, दुसरी धरली. नोकरी सुटली हें ऐकतांच तिनं डोळे भरून अश्रू माझ्या पुढ्यांत रिचवले होते ! माझ्या नव्या कामाला त्या अश्रूंनीं अपशकून केला होता !

[ चंद्रिका रडत आंत निघून जाते

**मुरली** : ताई— !

**चंद्रकांत** : जाऊं दे तिला ! पहिल्या नोकरीनंतर दहा नोकऱ्या मी ह्या दहा वर्षांत केल्या. प्रत्येक वेळीं तिचे हेच अश्रू ! मी मासिक काढलं–हिनं अश्रूंनीं त्याला अपशकून केला—मासिक बंद पडलं ! मी नाटकं काढलीं—त्यांना हिच्या अश्रूंनीं अपशकून झाला—नाटकं बंद पडलीं ! आणि आतां मी तमाशांत जात आहे—आणि पुन्हां ही ते अभद्र अश्रू गाळीत आहे ! पण मला त्यांची पर्वा नाहीं ! मी तमाशांत जाणार...जाणार आणि जाणार !!!

**मुरली** : ताईंना उद्देशून तुम्ही हे उद्‌गार काढूं तरी कसे शकतां चंद्रकांत ?— त्या आंत रडत आहेत. जाऊन त्यांची समजूत करून आणा.

**चंद्रकांत** : नाहीं ! मी तसं करणार नाहीं. माझ्या प्रगतिआड येण्याचा अधिकार तिला नाहीं, मुरली ! तिचा हा अक्रस्ताळेपणा मी चालूं देणार नाहीं !

[ मुरली आंत जातो.

...जा, हवं तर तूं तिची समजूत घाल; पण मी तमाशांत जाणार !

[ प्रकाश येतो.

**प्रकाश** : तमाशांत जाणार ? आणि तुम्ही ? वाहवा ! वाहवा ! मग बहार उडणार बरं राजा ! तुम्ही तमाशांत गेलांत, कीं मी देखील तमाशांत येणार बरं ! तमाशाचा निर्माता बनून आपण देखील अगदीं तुमच्या पावलांवर पाऊल ठेवणार !

**चंद्रकांत** : खरं म्हणतां प्रकाश ? खरंच येणार तुम्ही तमाशांत ?

**प्रकाश** : तमाशांत आणि नाटकांत कांहीं एक फरक नाहीं, चंद्रकांत ! मोठमोठीं माणसं देखील आतां अगदी हें म्हणूं लागलीं आहेत ! आम्ही धंदेवाईक माणसं ! नाटकाचा धंदा चालायला कठीण ! तमाशाचा धंदा चालायला मस्त ! पण प्रतिष्ठा आड येत होती ! आतां तुमच्यासारखी मंडळी जर त्यांत शिरणार म्हणते, तर मग प्रतिष्ठेचा प्रश्न येतो कुठं ! नाटक बंद ! आतां तमाशा करायचा ! ठांसून झालं पाहिजे ! !

[ मुरली येतो

**मुरली** : [ हतबुद्ध होऊन ] प्रकाश !

[ दोघे त्याला पाहून हसतात

**चंद्रकांत** : प्रकाश ! तमाशांत मी आजपासून जाणार आहे.

**प्रकाश** : आजपासून ?

**चंद्रकांत** : आतांपासून ! निघालोंच आतां मी भिंगरीकडं.

**प्रकाश** : चला, माझीही तयारी आहे.

**चंद्रकांत** : आतां ?

**प्रकाश** : आतां ! जिथं चंद्रकांत तिथं प्रकाश ! चला—

**चंद्रकांत** : अच्छा मुरली–टाटा !

[ जाऊं लागतात

**मुरली** : चंद्रकांत–प्रकाश–मागं फिरा—

[ चंद्रिका येते

**चंद्रिका** : मागं फिरा चंद्रकांत–चंद्रकांत मागं फिरा ! चंद्रकांत ! ! (रडते) गेले ! त्यांनीं एकदांही मागं वळून पाहिलं नाहीं ! चंद्रकांत ! !

[ मूर्च्छित पडते

**मुरली** :—ताई !

[ मुरली दिङ्मूढ बनून उभा राहतो

## अंक २ रा समाप्त

[ भिंगरीचें घर. चंद्रकांत आणि प्रकाश लोडाशीं बसले आहेत. भिंगरी गाऊन नाचत आहे असा देखावा. ]

**भिंगरी** : [ गाते

**शिरीं घडा घेऊन आली कुणी रूपसुंदर नार**
**चाले ठुमकत पाहा सुकुमार ॥ ध्रु० ॥**
**तनू गव्हाळ्या रंगाची पुलकित गात्रें**
**गर गर गर गर गर फिरवी नेत्रें**
**शर सुटले भेदुन ऊर । जिव झाला इकडे ठार**
**चाले ठुमकत पाहा सुकुमार ॥ १ ॥**

**चंद्रकांत** : बोला प्रकाश, लावणी कशी आहे ?

**प्रकाश** : मस्त !

**चंद्रकांत** : आज सकाळीं लिहिली. भिंगरीनं पाठ देखील करून टाकली ! कल्पना कशी आहे ?

**प्रकाश** : जिओ राजा ! ए वन् ! माणसांचा मुडदा पडला पाहिजे !

**चंद्रकांत** : ऐकलंस भिंगरी; शेठ म्हणताहेत माणसांचा मुडदा पडला पाहिजे !

**भिंगरी** : त्यांना म्हणावं माणसांचाच काय, तुमचाही मुडदा पाडला नाहीं तर मी नांवाची भिंगरी नाहीं !

**प्रकाश** : अच्छा ! पाहूंच तर मग ! कॉन्ट्रॅक्ट पक्कं समजा ! त्या सुभान्याच्या नादीं लागूं नका. येतों मी.

[ जायला निघतो

**भिंगरी** : कॉन्ट्रॅक्ट पक्कं झालं म्हणतां, मग तसंच जायला कसं निघतां ?

**प्रकाश** : मग ?

**भिंगरी** : तुम्ही नाटकी लोक ! तमाशांत नाचत असलें तरी ऐकून सवरून चालीरीतींची मलाही थोडी फार माहिती आहे. बसा जरा—बोली पक्की करून जा—

**प्रकाश** :—कशाची ?

**भिंगरी** : इश्श बाई !—बसा ना—बसा ना हो ! असं काय ?

[ चंद्रकांत त्याला बसायची खूण करतो

[ बसतो : भिंगरी पानपुड्याशीं जाऊन बसते.

**प्रकाश** : [ चंद्रकांतास एकीकडे ] ही बोली पक्कीची काय हो भानगड ?

**चंद्रकांत** : बसा हो, भितां कीं काय तिला तुम्ही ?

**प्रकाश** : कुणाला ? भिंगरीला ? अरे हुड् ! अशा छप्पन भिंगऱ्या फिरवून मोकळा झालोंय् मी ! पठ्ठा हार नाहीं जायचा अं !

**चंद्रकांत** : सांभाळा अं प्रकाश ! ह्या वल्गना पुरेत ! असे छप्पन प्रकाश पाहिलेत तिनंही ! तीही डगमगायची नाहीं तुम्हांला ! काय भिंगरी ?

**भिंगरी** : इश्श ! मला बाई लाज वाटते ! [ विडा करून पुढें होत त्याच्या समोर धरते ] हं, घ्या. म्हणा बोली पक्की !

**प्रकाश** : [ हात पुढें करीत ] बोली पक्की—

**भिंगरी** : [ हात मागं घेऊन ] फसायची नाहीं अं मी !—तोंड उघडा ना—असं काय तें ! [ आपोआपच तोंड उघडलें आहे त्यांत ती विडा घालते ] अच्छा ! आतां म्हणा बोली पक्की !

**प्रकाश** : क्—कशाची ?

**भिंगरी** : सांगा ना हो ह्यांना—हें पाहा कसं करताहेत तें !

**चंद्रकांत** : असं अनुभव नसल्यासारखं काय करतां प्रकाश ! बोला लौकर—म्हणा बोली पक्की म्हणून !

**प्रकाश** : ब—बोली पक्की !

**भिंगरी** : झालं तर मग. आम्ही लागतों पुढच्या तयारीला आतां. तुम्ही या आतां गडबड असली तर !

**प्रकाश** : त—तशी गडबड मला नाहीं—[ चंद्रकांत डोळ्यांनी दाबतो ]—ओ ! बरं ! येतों मी. फार फार गडबड आहे माझ्या पाठीशीं.

[ उठून बाहेर निघून जातो. तो गेल्यावर भिंगरी आणि चंद्रकांत हसतात.

**भिंगरी** : काय हो, थट्टा करतां काय गरीब माणसाची ?

**चंद्रकांत** : प्रकाश गरीब नाहीं. बनेल बकरा आहे. कांपला पाहिजे लेकाला चांगला !

**भिंगरी** : त्या बनेल बकऱ्याचं म्हणालें वाटतं मी ? मी माझं म्हणत होतें !

**चंद्रकांत** : तुला तरी कोण लेकाचा गरीब गाय समजतोंय इथं ?

**भिंगरी** : ऊं: जा ! असं नाहीं अं बोलायचं ! [ हंसते ] खरंच, किती, किती थट्टेखोर स्वभाव आहे तुमचा !

**चंद्रकांत** : असं ?

**भिंगरी** : तुम्हीही बरेच बनेल आहांत कीं ! अं ? मला देखील तुम्ही सहीसही बनवलींत ?

**चंद्रकांत** : काय बनवलं तुला ?

**भिंगरी** : त्या बोली पक्कीच्या रीतीबाबत !

**चंद्रकांत** : [ तो हंसतो ] आतां काय झालं ?

**भिंगरी** : माणसाच्या मनाची कल्पना नाहीं यायची तुम्हांला—

**चंद्रकांत** : मनोविश्लेषण करणारा मी लेखक आहें भिंगरी—जातिवंत मनोवेत्ता आहे मी ! पण तुला त्याची कल्पना कशी येणार ?—तुला सायकॉलजी माहीत असणं शक्य नाहीं ?

**भिंगरी** : ही कोण नवी बया आतां ? काय नांव म्हणालांत तिचं ?

**चंद्रकांत** : [ तिची कींव करीत ]—चू चू—! भिंगरी !—

**भिंगरी** : मी ?—खरंच ? [ जवळ जाऊन ] थट्टा नाहीं ना ?

[ सुभान्या येतो. बरोबर तात्याही आहेच. त्यांना पाहून चंद्रकांत चमकून दूर लोटतो तिला.

**तात्या** : आवो चालायचंच ! आमाला त्येची संवय झालीयू आतां ! काय सुभान्याबा ?

**चंद्रकांत** : छे छे—तसं नाहीं तें. गैरसमज झालाय् तुमचा. [ गडबडीनें ] बरं येतों मी—नंतर भेटूंच आपण !

[ बावरून निघून जातो.

**तात्या** : सुभान्याबा, पाहिलंत ?—कच्चं काम दिसतंय अजून !

**भिंगरी** : हां, तात्या, फाजीलपणा बस झाला—

**तात्या** : राहिलं ! आमचं काय हो !

**भिंगरी** : [ सुभान्याला ] बसा ना—

**तात्या** : हां—आरं बस ना सुभान्याबा ! हुबा कां ?

[ स्वतः जाऊन बसतो

**भिंगरी** : बसायचं नाहीं कां ?

**सुभान्या** : कशाला ?

**तात्या** : घ्या ! कशाला ?–आरं आल्यासारखं च्यापाणी नगं व्हंय इथं !–बस म्हणत्यात बसावं आपलं !

**सुभान्या** : बसून कां आतां आपली शोभा करून घ्यायची तात्या ? आपण इथं येण्याचीच चूक केली !

**तात्या** पार येड्यावाणी काय रं बोलावं सुभानबा ! आरं चुका बी हुत्यात माणसांच्या हातून. म्हणून च्याय पाणी चुकलंय् कां ? च्याय पाण्यावर राग काढून चालणार व्हय ? बस बगूं. बसा म्हणतंय माणूस–बसावं !

**सुभान्या** : तमाशाच्या फडांत असलीं हजरजबाबी संपादनी तूं केलीस, तर जीव ओवाळून टाकीन मी तुझ्यावरून तात्या. पण हा तमाशा नाहीं. गंमत नाहीं.

**तात्या** : ऑ ? म्हणजे ?

**सुभान्या** : भिंगरी, साफ साफ सांग आज मला–तुला तो पाहिजे की मी ?

**भिंगरी** : अगदीं तुमची लग्नाची बायकोच मी असल्यासारखं बोलताय सरदार तुम्ही ! मी तमाशांत नाचणारी नायकीण आहे ? बायको नाहीं तुमची !

**सुभान्या** : तुझ्यासाठीं मीं माझी बायको सोडली. कायमचं नांव टाकलं तिचं !

**भिंगरी** : आणि तिनं तुमचं टाकलं ! पाट लावून दुसरा नवरा करून गेली ती– माहीत आहे मला सारं– पुन्हां सांगायची गरज नाहीं !

**सुभान्या** : बेशरम अवलाद !

**भिंगरी** : हां सुभान्या ! खबरदार ! जास्त बोलायचं काम नाहीं. दरवाजा मोकळा आहे तुमच्यासाठीं. चालते व्हा घरांतून माझ्या !

[ तात्या खडबडून उठतो

**सुभान्या** : कमअस्सल अवलाद ! जहरी नागण ! जातीवर गेलीस तूं अखेर अं ?

**भिंगरी** : कम अस्सल तूं ! एवढा अस्सल बीजाचा होतास, तर इथं कशाला आलास शेण खायला ?

**सुभान्या** : खामोष ! एक अक्षर तोंडांतून काढशील तर जीभ हासडून वाचा खाड्कन् बंद पाडीन मी तुझी !

**भिंगरी** : अग बया बया बया ! अरं नको ! कुणी ऐकेल बघ;–जीभ हासडाया निघालाय माझी ! बोटी बोटी तरी वांट्याला येईल कां तुझी !

**सुभान्या** : इतकी हिंमत? कोणता मायेचा पूत समोर उभा करणार आहेस माझ्या?

**भिंगरी** : अंगाला हात तर लाव माझ्या, कुत्र्याच्या मौतेनं नाहीं मेलास तर नांवाची भिंगरी नाहीं मी !...नेभळट ! मुर्दाड मेला !!

**सुभान्या** : [ चवताळून ] खबरदार !

**तात्या** : बापू !

**भिंगरी** : अरं येऊं दे कीं त्याला—अंगाला हात तर लावून बघूं दे, मग दाखवतें ह्या भिंगरीचा तमाशा !

**सुभान्या** : बाजूला हो तात्या ! ही नागीण ठेचूं दे मला !

**भिंगरी** : चालता हो घरांतून माझ्या !—नाहींतर लाथ मारून हाकून लावतें. गुमान जा आतां—!

**सुभान्या** : अस्सं ! ठीक आहे; जातों मी ह्या घरांतून. चालतां होतों. पण याद राख; मीही नांवाचा सुभान्या आहे ! अन्नाला लावली आहे मीं तुला ! चालबाजी केलीस तर अन्नाला मोताद बनून फिरावं लागेल तुला !

**भिंगरी** : अरे जा, वाघीण आहे मी ! वाघ भेटलाय मला माझा ! कोल्ह्याच्या दमाला घाबरत नाहीं मी—जा !

**सुभान्या** : तात्या—

**तात्या** : बोला सुभान्याबा !

**सुभान्या** : ऐकलंस ही काय म्हणाली तें? तो वाघ आहे, मी कोल्हा आहे !

**तात्या** : आवो माणसावाणी माणसं दोन्ही ! काय ऐकताय ह्या पोरीचं ! अजून हिला वस्ताद भेटला नाहीं म्हून चुरूचुरू बोलतिया !

**सुभान्या** : भेटला नसला तर आज रात्रीं हिला जरूर वस्ताद भेटेल तात्या ! आज रात्रीं ! लालबागच्या थेटरांत ! सुभान्यासह तात्या आणि गंग्या हिच्या वाघाशीं सामना देणार !!

**तात्या** : आवो काय सामना खेळणार त्यो ! नाटकं करणारं माणूस तमाशांत हुब ऱ्हाणार किती न् करणार काय? तमाशा म्हंजे नाटक नव्हं !

**सुभान्या** : अच्छा भिंगरी ! तयार राहा म्हणावं तुझ्या त्या वाघाला. अन् तूं पण तयारीनं ये. ठांसून झालं पाहिजे !

[ जातात : पडदा : पुढचें दृश्य ]

---

अंक ३ रा  दृष्य २ रें

[ रस्ता : स्थळ लालबाग. एक पोऱ्या ओरडत जातो.

**पोऱ्या** : शिलेदार ! शिलेदार ! ! किंमत दोन आणे ! चंद्रकांतसह भिंगरी ! सुभान्या सह तात्या आणि गंग्या ह्यांचा जोरदार सामना ! दोन आणे ! !

[ मुरली आणि प्रकाश ह्यांची गांठ पडते.

**प्रकाश** : कोण मुरली ? अरे असा भांबावून काय बघतोस ! माणसं सुद्धां दिसत नाहींत अं तुला !

**मुरली** : प्रकाश ! किती दिवसांनीं भेटतो आहेस !—मी त्या पोऱ्याचं ओरडणं ऐकत होतों ? चंद्रकांत आणि सुभान्याचा सामना !...

**प्रकाश** : ये बात है ! टाळी ! !—कल्पना कुणाची, माहीत आहे ? माझी !

**मुरली** : तुझी ?

**प्रकाश** : टाळकं चालवावं लागतं बाबा ! तेव्हां कुठं पैसा मिळतो. बोल ! कशी आहे कल्पना ? हौशी नाटककार आणि तमासगीर चंद्रकांत ह्याचा सुभान्या तमासगीराशीं खराखुरा सामना ! ठांसून झालं पाहिजे !

**मुरली** : पण चंद्रकांतनं कबुली दिली आहे ह्या सामन्याला ?

**प्रकाश** : अरे यह तो बात है भैय्या ! कबूल म्हणजे एकदम कबूल ! मोठी बहार उडणार आज ! पैजेचा विडाच म्हण ना ! जो जिंकील त्याची भिंगरी !

**मुरली** : चंद्रकांत ह्या सामन्यांत हरले तर मला मनापासून आनंद होईल ?

**प्रकाश** : भले बहाद्दर ! म्हणजे हो ?

**मुरली** : प्रकाश ! सहा महिने झाले ! तमाशाच्या थिएटरांत पाय ठेवायला चंद्रकांत भीत होते ! मीं त्यांना सहज गंमत म्हणून तिकडं खेंचून नेलं. त्या दिवसापासून त्यांच्या जीवनांत भयंकर झंझावात शिरलाय्–आपलं स्वत्व चंद्रकांत विसरले. प्रेमळ पत्नीच्या प्रेमाला लाथाडून त्यांनीं भिंगरीसारख्या मूर्ख बायकोच्या घरांत प्रवेश केला...प्रकाश, त्या साध्वी स्त्रीची आजची स्थिति पाहिली, कीं मला स्वतःला अगदीं चोरट्यासारखं होतं !

**प्रकाश** : चंद्रकांतनं बायकोला टाकलं म्हणतोस मुरली ! छे, मला नाहीं हें खर वाटत ?

**मुरली** : दिवसाचे चोवीस तास भिंगरीभोवतीं घोटाळत राहिलेला माणूस आपल्या बायकोला मुकल्यासारखाच झाला नाहीं तर काय? बिचारी उपास-तापास सहन करीत आहे! बघवत नाहीं रे तिच्या त्या दैन्यावस्थेकडे!

**प्रकाश** : पण चंद्रकांत पैसे देत नाहीं घरी?

**मुरली** : प्रथम त्यानें पैसे देण्याचा प्रयत्न केला, पण ताईंनीं त्यांच्या त्या पैशांना हात लावायचं नाकारलं. चंद्रकांत भडकून गेले. पुन्हां तुझं तोंड बघणार नाही म्हणाले. त्रागा करून घराबाहेर चालते झाले? ताईंना उपासमार घडूं लागली!

**प्रकाश** : मग?

**मुरली** : मीं मदत करण्याचा प्रयत्न केला. पण त्या बाणेदार स्त्रीनं मदत स्वीकारण्यास साफ नकार दिला–

**प्रकाश** : अरे!

**मुरली** : अखेर...अखेर! मला युक्ति करावी लागली. त्या साध्वीशीं सद्हेतूनं प्रतारणा खेळावी लागली. मी खोटं बोललों. एक निराळीच गोष्ट केली—

**प्रकाश** : काय केलं?

**मुरली** : मला बनावट माणसं तयार करावी लागलीं. मुळींच अस्तित्वांत नसलेल्या हौशी नाट्यमंडळांचे ते कार्यकर्ते आहेत अशा बहाण्यानें त्यांना ताईकडं पाठवाव लागलं. त्यांनीं चंद्रकांतच्या नाटकांचे प्रयोग करायची परवानगी लटकीच मागून ताईंना त्याबद्दल पैसे दिले! हे पैसे स्वीकारून त्यांनीं आतांपर्यंत कसं तरी चालवलं आहे–

**प्रकाश** : शाबास! सच्चा मित्र आहेस चंद्रकांतचा!

**मुरली** : पण माझ्या ह्या बेताचा ताईंना संशय तर येणार नाहीं ना, ही भीति मला पडली आहे! तसं जर झालं, तर मग मात्र भलताच प्रसंग त्या स्वतःवर ओढवून घेतील अशी भीति मला वाटते!...आणि म्हणूनच चंद्रकांत आज अपेशी ठरले तर मला मनांतून खूप खूप आनंद होईल!

**प्रकाश** : मुरली, खरं सांगूं? भावनातिरेक हा कुठंही काय वाईटच. एक मित्र म्हणून नव्हे, सामान्य माणूस म्हणूनही नव्हे, तर जन्मजात कलाकार म्हणूनच आपण चंद्रकांताकडे पाहिलं पाहिजे! त्यांची पत्नी एक गरीब बापडी स्त्री असेल, अडाणी असेल, मूर्ख असेल; पण तिच्या मूर्खपणानं तिनं चंद्र-

कांतच्या कलेच्या प्रगतीच्या मार्गांत धोंड बनून राहण्याचा तिला अधिकार नाहीं! आणि चंद्रकांतच्या अंगच्या सर्व कलागुणांचा बळी देऊन तिच्या लहराखातर त्या गुणी माणसाच्या कलागुणांची माती करण्याचाकुणालाच हक्क नाहीं! माझं हें स्वच्छ मत आहे !

**मुरली** : प्रकाश! बडबडतां काय? चंद्रकांतच्या कलागुणांना अडथळा ताईसारखी साध्वी स्त्री झाली नाहीं हें मला माहीत आहे !

**प्रकाश** : स्त्री नुसती साध्वी असून भागत नाहीं. ती भिंगरीइतकी सुंदर, भिंगरी-इतकी चाणाक्ष, भिंगरीइतकी स्फूर्तिशाली असावी लागते मुरली! तेव्हां कुठं चंद्रकांतसारखा कलाकार घरच्या चार भिंतींत डांबून राहूं शकतो. चंद्रिकासारखी स्त्री जन्मजात कलावंताला काय स्फूर्ति देणार? त्याच्या बुद्धीची भूक, रसिकतेची तहान, काव्यकल्पनेची आसुसा कशी पुरवूं शकणार! ती त्याच्या प्रगतीला खीळच घालणार! त्याच्या मार्गांत धोंडच बनणार!

**मुरली** : बस्! फार बोललांत तुम्ही प्रकाश! ताईंना तुम्ही ओळखलं नाहीं! चंद्रकांतचा उत्साह थिजवून टाकायला ताई कारणीभूत नाहींत. तुम्हां आम्हां-सारखे नादान मित्र आहेत!

**प्रकाश** : मुरली!

**मुरली** : त्यांच्या कलेला धार देण्याच्या गोष्टी करतां? एक छदाम तरी खर्च केला होता का तुम्हीं त्यांच्या नाट्यकलेला धार देण्यासाठीं?

**प्रकाश** : मी त्यांचं नाटक बसवायला घेणार होतों. सातशें रुपये नक्त खर्च करायला तयार होतों. पण ही अडाणी बाई आड आली. तिनं ॲडव्हान्स दिलेला देखील माझ्या तोंडावर फेंकून मारला!

**मुरली** : ॲडव्हान्स? किती! पांच रुपये!! एकूण सारा मोबदला पंधरा रुपये! माहीत आहे तेंही मला! पंधरा रुपयांत कागद शाईचा खर्च तरी वसूल होईल का त्यांचा नाटकाचा? नाटकाचा खर्च सातशें रुपये! मामुली नटीला पाऊणशें रुपये! आणि लेखकाला पंधरा रुपये! कर्णाचं औदार्य आहे तुम्हां निर्मात्यांजवळ!

**प्रकाश** : त्यांच्या घरांतली बारीकसारीक बातमी त्यांच्या पत्नीनं तुमच्याजवळ सांगितलेली दिसते! बराच जवळून परिचय दिसतो तुमचा?

**मुरली** : खबरदार प्रकाश! तोंड आवरून बोला! दुनियेंतली सारींच माणसं तुमच्यासारख्या पाजी आणि हलकट माणसांसारखीं आहेत असं समजूं नका

आमचा किती परिचय आहे, त्याची कल्पना करण्याची देखील लायकी तुमच्या जवळ नाहीं!

**प्रकाश** : अच्छा? ठीक आहे! पाहून घेईन! वेळ आली म्हणजे उत्तर देईन मी ह्याचंदेखील!

**मुरली** : त्या उत्तराला प्रत्युत्तर देण्याची धमक आहे माझ्यांत!

**प्रकाश** : असं?

**मुरली** : हो हो असं! [ प्रकाश जातो ]—पाजी!!

[ मुरली जातो.

[ पडदा उघडतो : पुढील दृश्य ]

---

अंक ३  दृश्य ३ रें

[ तीच रात्र. लालबागच्या तमाशाच्या थिएटरांतील रंगभूमी—सुभान्या, तात्या, गंग्या नाच्या, आणि त्यांची तमासगीर साथीदार मंडळी—तमाशा चालू आहे. गंग्या नाचत आहे. नाच संपल्यावर कर्कश शीळ घालून सुभान्या पुढे येतो: कानाला हात लावून तात्याला चढ्या आवाजांत हांक मारतो— ]

**सुभान्या** : तात्या—

**तात्या** : बोला बापू—

**सुभान्या** : आजची गंमत ठांसून झाली पाहिजे! आज तमाशाला कोण आलंयू माहीत आहे ना?

**तात्या** : कोण कोण आलंया बापू?

**सुभान्या** : आज वाघोबा आलायू!

**तात्या** : म्हंजे जेजुरीचा कां काय? आन् त्येची ती भवानीबी आली आसलंच!

**सुभान्या** : भवानी नव्हे, वाघीण म्हणतेय ती स्वतःला आतां!

**तात्या** : खरं? नाचतांना उड्या मारल्यागत नाचतीय म्हून का काय?

**सुभान्या** : हें बग तात्या, एखाद्या सुंदर माणसाला नांवं ठेवूं नये. आपल्या

पुरतं बघावं. दुसऱ्याच्या पंचायती करूं नयेत. आपला गंग्या कुठं अजून चांगलं नाचतोय !

**तात्या** : हां ! बापू, हें नाहीं आं ऐकून घेणार मी ! गंग्या कुठांय–गंग्या–

**गंग्या** : बोला तात्या—

**तात्या** : आब राखणार का शोभा करून घेणार आज ?

**गंग्या** : मायबाप प्रेक्षकानी ठरवावं !

**तात्या** : बराबर म्हनतुंयास–होऊन जाऊं दे–ठांसून झालं पाहिजे !

[ ढोलकीची थाप : गंग्या नाचायला प्रारंभ करतो. भिंगरी त्वेषानं पुढं येते. चिडून नाचूं लागते. साथ बंद–नाच बंद–दुसऱ्या क्षणीं भिंगरीचे साथवाले आणि चंद्रकांत. भिंगरी नाचांत गंग्याला हरवते.

**चंद्रकांत** : शाबास ! शाबास भिंगरी ! ! जिरवलीस खरी ! !

**सुभान्या** : [ उपहासानें ] अरे बायकोच्या कर्तबगारीवर उड्या काय मारतोस ? रक्तांत जोर असेल, तर होऊन जाऊं दे आतां तुझी–माझी !

**चंद्रकांत** : कबूल ! होऊन जाऊं दे !

**तात्या** : पण तें एका शर्तीवर ! ह्या सामन्यांत ज्याची हार हुईल त्याची हालगी तुणतुण्याची आणि ढोलकीची लूट जितील त्यानं घेऊन जावी ! कबूल ?

**चंद्रकांत** : कबूल !

**सुभान्या** : आणखी एक जीत ! जो जिंकील त्यानं भिंगरीही जिंकली असं समजायचं ! कबूल !

**चंद्रकांत** : पण—

**भिंगरी** : थांबा सरदार, मी सांगतें–कबूल ! होऊन जाऊं दे ! वाघाचं कातडं पांघरणारं कोल्हं कधीं वाघ व्हायचं नाहीं !

**सुभान्या** : कबूल आहे ?–असली हिंमत तर भरा होकार !

**चंद्रकांत** : माझी ना नाही.

**तात्या** : सवाल कवनांत इच्यारायचे; जबाब कवनांत जडायचे. सारं कांहीं इथल्या इथंच झालं पाहिजे. कबूल ?

**चंद्रकांत** : शीघ्र कवि आहे मी. हार खाणार नाहीं. कबूल !

**तात्या** : सुभान्याबा, काम मोठं फांकडं हाय ! होऊन जाऊं दे ! ठांसून झालं पाहिजे !

**सुभान्या** : [ गातो ]

ऐक शाहिरा तुला सांगतों गर्व फुकाचा करूं नको
चोराला शिरजोर भेटतो जगांत हें विस्मरूं नको
अपल्याहुन कुणि असेल कमती खुळी कल्पना धरूं नको
उरली सुरली जिरविन गुर्मि येच पुढें चल हरूं नको
॥ जी जी रं जी जी चल जी जी रं जी जी ॥

**चंद्रकांत** : दंड थोपटुन बंड कराया आलास मागं सरूं नको
मेल्या आइचं दूध नाहिं प्यालों उगीच दुर दुर करूं नको
चल ये मर्दा उडविन खुर्दा संशय कुठला धरूं नको
अस्सल गुरुचा असशिल तर बा परतुन मागं फिरूं नको।

**सुभान्या** : खुर्दा उडवणार खुर्दा झाले नांव गुरुचं घेऊं नको
देवानं माणसाची वाचा दिधली नांव गुरुला ठेवूं नको
साही शास्त्रं अठरा पुराणं पाठांतर कर राहूं नको
सद्गुरु माता समर्थ माझी अंत तियेचा पाहूं नको

**चंद्रकांत** : पोपटपंची धंदा दिसतो तुझ्या गुरूचा राव मला
वरून भिजला आंत नाहीं शिजला धर्म जिथं तिथं देव कुठला
असा अपेशी सदा उपाशीं सांग कशाला गुरु म्हटला
तान्हेल्याची तहान जाईना तुझ्या गुरुचा ठाव आटला ॥

**सुभान्या** : मानभावाला फणी कशाला वाद करावा मुसाफिरा
वेणीफणीची इच्छा धरावी भटणीनं बोडक्या काय नरा
उद्धारांच्या वेदांताच्या गोष्टी कशाला तुला वरा
वाजिव ढोलकं तुणतुणं हालगं नाचिव नाच्या तमासगिरा ॥

**चंद्रकांत** : गोष्ट मोलाची तुला सांगतों हालगं तुणतुण्याचा ताल वरा
मर्दाचं गाणं मर्दच जाणं सभेंत माझ्या रंग भरा
तुणतुणं हालगं वाजतंय ढोलकं त्यांत नाहीं हालकं कुठं मला
सायकॉलॉजीचं तत्त्व सांगतों कळायचं नाहीं खुळ्या तुला

**तात्या** : सुभान्याबा—

**सुभान्या** : बोला तात्या—

**तात्या** : गॉटमॅट गॉटमॅट विंग्रजी रं का बोलतुंया हा पाव्हणा ?

**सुभान्या** : तूंच सांग मला कां तें ?

**तात्या** : ह्याचा बाप चुकून विंग्रज साहेब तर न्हवता ?

**चंद्रकांत** : हां—खबरदार! शिव्या द्यायचं काम नाहीं!

**तात्या** : आरं चिडतुयास का असा? सामना हाय ह्यो! तमाशा ह्यो! नाटक नव्हं!

**चंद्रकांत** : मुद्याचं बोला. शिव्या नकोयत!

**भिंगरी** : येणार काय त्याला मुद्याचं ?

**तात्या** : अग ए—जरा थांब. जरा थांब! [ गातो ]

**अगाड्याचं बगाडं गाड्याचं रूमणं**
**कौठं वाल्यानं घोडं जुपलं**
**पुण्याला गेलं दांतघशीं पडलं**
**कुबाड मोडलं फरासखान्यामंदीं नांव टिपलं**
**सांग माझं घोंगडं। चटई न् टिनपाट॥ धृ०॥**

**चंद्रकांत** : हें काय ?

**तात्या** : आरं सवाल हाय हा शाहिराचा!

**भिंगरी** : असा कसा सवाल ?

**तात्या** : जसं माणूस तसा सवाल! चल दे उत्तर. न्हायतर हार कबूल कर. काय रं सुभान्याबा ?

**सुभान्या** : अलबत्!

**भिंगरी** : पण सवाल विचारायचा तात्याला काय हो अधिकार ?

**तात्या** : अधिकार हाय! सुभानबा म्हंजेच मी! मी म्हंजेच सुभानबा! काय रं सुभान्याबा ?

**सुभान्या** : अलबत्!

**चंद्रकांत** : पण सवाल समजला नाहीं तर उत्तर कसं काय द्यायचं ?

**तात्या** : समजायला डॉकं लागतंया! निसतं विंग्रजी आसुनशान भागत न्हाई! काय रं बा ?

**सुभान्या** : अलबत्!

**भिंगरी** : [ चंद्रकांतला ] अहो सरदार! आटपा कीं लौकर. द्या ना त्याला उत्तर!

**तात्या** : सा महिने पटकला तरी उत्तर मिळायचं न्हाई त्याच्या बाला—सवालच बेरकी हाय माझा ! पुना आईक ! नीट आईक !—ह्या रं गड्यांनो साथ— [ गातो

**आगगाड्याचं बगाडं गाड्याचं अरुमणं**
**कौठवाल्यानं घोडं जुपलं**
**पुण्याला गेलं । दांतघशीं पडलं**
**कुबाड मोडलं । फरासखान्यामंदी नांव टिपलं**
**सांग माझं घोंगडं । चटई न् टिनपाट**

[ शेवटची ओळ चंद्रकांतला खिजवायला गातच राहातात. गंग्या आणि तात्या त्याला खिजवायला नाचतात. भिंगरी 'सांगा' म्हणून गळ घालतें. पण चंद्रकांत चिडून जाऊं लागतो. भिंगरी निघते. पण मुभान्या तिचा हात धरून ठेवतो. पडदा पडतो. पुढचें दृश्य दिसूं लागतें.

---

अंक ३ रा  दृश्य ४ थें

[ पडद्याच्या आंत मागचा दरवाजा. चंद्रकांत चिडून निघाला आहे. प्रकाश त्याला अडवतो.

**प्रकाश** : चंद्रकांत, कुठं निघालांत ?

**चंद्रकांत** : मसणांत ! सोडा माझा रस्ता प्रकाश !

**प्रकाश** : नाही, एका मामुली खेडवळ माणसानं तुमचा असा पराभव केलेला मी सहन करणार नाहीं !

**चंद्रकांत** : पण माझा पराभव झाला असं म्हणतो कोण ?

**प्रकाश** : सारे प्रेक्षक म्हणतात ! सारं जग उद्यां तेंच म्हणेल ! त्यानं तरी दुसरं काय म्हणावं ?

**चंद्रकांत** : जगाशीं मला काय करायचं आहे ! मला माहीत आहे, त्याची ती मूर्खपणाची बडबड काय आहे ती मी जाणतों !

**प्रकाश** : जाणतां ? मग निघून कां जातां ? द्या, झणझणीत उत्तर द्या. तुमची प्रतिष्ठा वाढेल. माझं मुद्दल व्याजासह वसूल होईल !

**चंद्रकांत** : तुमचं मुद्दल !

**प्रकाश** : विसरलांत कीं काय ? तुमचा माझा करार झाला आहे ! कॉंट्रॅक्ट घेतलं आहे मी तमाशाचं तुमच्या–दीडहजार रुपये महिना ! पांचशें रुपये मीं आगाऊ दिले आहेत तुम्हांला !

**चंद्रकांत** कॉंट्रॅक्ट ! स्वतः तुम्हीं घातलेले पैसे ! त्यासाठीं माझ्या प्रतिष्ठेचा सौदा मांडला आहे तुम्हीं ?

**प्रकाश** : तुमचीच नव्हे, माझीही प्रतिष्ठा त्यांत आहेच ! तमाशाची जाहिरात केली आहे मी ! भिंगरीला पैसे दिले आहेत ? तुम्हीं माझा विश्वासघात केला तर मला वीष खाऊन मरायची पाळी येईल. बायको पोरं देशोधडीला लागतील माझीं !

**चंद्रकांत** : बायको पोरं देशोधडीला लागतील तुमचीं ? अन् माझी ?—पोरं नाहींत मला, पण माझी चंद्रा !...चंद्रा !–प्रकाश ! ह्या सहा महिन्यांत मी माझ्या चंद्राला विसरून गेलों. माझ्या प्राणाला मी कसा विसरून गेलों हो प्रकाश ? काय वाटत असेल तिला ! माझ्या वाटेकडं सारखे डोळे लावून बसली असेल माझी चंद्रा ! प्रकाश ! मी कुठं आहे ? मी इथं कसा आलों ? कुणी मला इथं आणलं ?

**प्रकाश** : चंद्रकांत ! असं वेड्यासारखं काय करतां ? तुम्ही स्वतःच इथं आलांत नव्हे का ?

**चंद्रकांत** : इथं मी आलों ? स्वतः आलों ? ह्या घाणींत—इथं मी कसा आलों ?

**प्रकाश** : मराठमोळा रंगभूमीचा मोह पडून तुम्ही इथं आला आहांत. कलेच्या सेवेकरतां इथं येऊन तुम्हीं केवढा आत्मयज्ञ केला आहे !

**चंद्रकांत** : सुंदर शब्दांनीं हिडीस वस्तूला मांगल्य केव्हांच लाभणार नाहीं प्रकाश ! ही मराठमोळा रंगभूमी असेल; पण हें माझं क्षेत्र नव्हे ! माझं क्षेत्र गिरणगांवची हौशी रंगभूमी आहे ! दामोदर हॉल आहे ! इथं मी चुकून आलों. माझं क्षेत्र तें आहे !

**प्रकाश** : उद्यां वर्तमानपत्रांतून एका अशिक्षित तमासगिरानं तुमचा पराजय केला असं छापून येईल. तुमची प्रतिष्ठा धुळीस मिळेल—नांवलौकिक खाक बनेल !

**चंद्रकांत** : माझी प्रतिष्ठा तमाशांत येऊनही धुळीस मिळालेली नाहीं, हें जगाच्या निदर्शनास आणून देण्याचं सामर्थ्य माझ्या लेखणींत जोंवर शाबूद आहे, तोंवर मला जगाला भिण्याचं कारण नाहीं !

**प्रकाश** : आणि भिंगरी? ती तुमच्या जीवनांतून कायमची निघून जाईल त्याचं काय?

**चंद्रकांत** : माझं जीवन भिंगरीभोंवतीं फिरत आलं नाहीं. चंद्रिकेच्या शीतल, मंगल प्रेमांत तें जोपासलं गेलं आहे. भिंगरी क्षणभर आली आणि गेली. पण तो अपघात होता! अपघातांतून मी बचावलों!

**प्रकाश** : मग आतां तुम्ही करणार काय? पुन्हां उपाशी मरायला रंगभूमीवर जाणार?

**चंद्रकांत** : खऱ्या कलावंताच्या नशिबीं उपासमार, अवहेलना, अनुल्लेखच असतात! उपासमारीची, अनुल्लेखाची, अवहेलनेची मला आतां संवय झाली आहे! त्यांची मला भीति वाटत नाहीं!!

**प्रकाश** : जाणून बुजून आगींत उडी घेणार म्हणतां? शहाणपणा नाहीं हा चंद्रकांत!

**चंद्रकांत** : प्रकाश! यशवंतांचं 'यशोधन' वाचलं आहे तुम्हीं? तो कविश्रेष्ठ म्हणतो—

**'ग्रीष्माचा दाह काय वाळल्या तृणा**
**राखेला जाळिल कां अग्नि तो पुन्हां!'**

**प्रकाश** : अर्धे कवन सांगीतलंत चंद्रकांत हें तुम्हीं मला! त्या चरणांपुढचे चरण नाहींत आठवत तुम्हांला!

**'परि तुझी न भेट मला व्हायची पुढें**
**ह्या शल्यें हें तुटतें मात्र आंतडें!'**

तुम्ही जाणार म्हणतां, कोण तुम्हांला रोखूं शकणार? कुणीच नाहीं! पण भिंगरी? तिला तुम्ही पुन्हां पाहूं शकणार नाहीं! ती तुमच्यावर प्रेम करीत आहे—खरं, निस्सीम प्रेम करीत आहे—तमाशांत नाचणारी एक मामुली नायकीण झाली तरी तिला मन आहे, संवेदना आहेत, हृदय आहे! कां तिच्या जीवनांत आलांत? कां तिला नादीं लावलींत? कां तिला ठार केलींत?

**चंद्रकांत** : तुम्ही म्हणतां तें सत्य असेल, तर मला वाईट वाटतं—भिंगरी तमाशांत नाचणारी नायकीण आहे, म्हणून मी तिला दोष देत नाहीं! कुठल्या परिस्थितींत तिनं तो पेशा पत्करला त्याची मला माहीती नाहीं!

**प्रकाश** : पण तिच्या प्रेमाचं काय!

**चंद्रकांत** : तिचं प्रेम जर कलंकित नसेल, शुद्ध असेल तर तिला त्याबद्दल कधींही पश्चात्ताप होणार नाहीं ! मी तसं प्रेम उपेक्षित मानणार नाहीं. हा पाहा, तशा त्या मंगल निर्मल प्रेमाला माझा दोन्ही हात मस्तकीं जोडून शतशः प्रणाम !

**प्रकाश** : हे नुसते शब्द झाले ! प्रत्यक्ष कृतीखेरीज शब्दाला किंमत तोंडच्या वाफेएवढीच ! तिच्या प्रेमाला प्रेमाचीच प्रतिसाद देण्याचं तुमचं खरं कर्तव्य आहे !

**चंद्रकांत** : कर्तव्य ? माझं खरं कर्तव्य माझ्या पत्नीशीं—त्या निष्पाप प्रामाणिक जीवाशीं एकनिष्ठ राहाण्याचं आहे ! मला प्रथम घरीं गेलं पाहिजे. चंद्राची क्षमा मागितली पाहिजे ! चला, बाजूला व्हा; जाऊं द्या मला—

[ जाऊं लागतो. भिंगरी प्रवेशते.

**भिंगरी** : थांबा !

[ थबकतो. भिंगरी प्रकाशकडे बघते. तो काढतां पाय घेतो ]

कुठं निघालांत ?

**चंद्रकांत** : घरीं !

**भिंगरी** : घरीं ? मला सोडून ?

**चंद्रकांत** : हो ! माझी हार झाली ! सुभान्याची जीत झाली !

**भिंगरी** : नाहीं. वाघाची हार झाली नाहीं. कोल्ह्याशीं झुंझ देण्यांत त्याला कमीपणा वाटला. त्यानं त्याच्याकडं दुर्लक्ष केलं. चला मागं, तमाशांतलीं माणसं तुम्हांला आणा म्हणून ओरड करताहेत !

**चंद्रकांत** : माझी जीत झाली असं कबूल करताहेत लोक ?

**भिंगरी** : हो ! एकमुखानें कबूल करताहेत—चला परत !

**चंद्रकांत** : [ समाधानानें ] भिंगरी ! विजेता वीर म्हणून परत जात आहें मी ! विजयाचा उन्माद माझ्या गात्रागात्रांना बघ कसा थरारून सोडीत आहे !

**भिंगरी** : असं कांहीं बोलूं नका ना ! मला भयंकर कांपरं भरल्यासारखं झालं आहे ! चला परत. चला ना.

**चंद्रकांत** : नाहीं भिंगरी ! संपला आपला ऋणानुबंध !

**भिंगरी** : ऋणानुबंध संपला ! काय म्हणतां ?

**चंद्रकांत** : भिंगरी ! मी एक द्रष्टा कवी आहे ! एक मधुर स्वप्न बघण्याचा खेळ खेळत होतों मी ! स्वप्न संपलं आतां—

**भिंगरी** : स्वप्न संपलं? सरदार! स्वप्न संपलं तुमचं–खेळ झाला क्षणाचा तुमचा! पण माझा मात्र प्राण गेला!

**चंद्रकांत** : [ व्याकळून ] भिंगरी!

**भिंगरी** : नका नका–असं व्याकळून जाऊन बोलूं नका. मी तुम्हांवर रागावलें नाहीं. नाचणारी नायकीण असलें तरी माणूस आहे मी! मला मन आहे, विचार आहेत, संवेदना आहेत! मी समजूं शकतें.

**चंद्रकांत** : खात्री होती माझी ती भिंगरी! तूं फार फार समंजस आहेस!

**भिंगरी** : [ प्रयासानें आवंढा गिळून ] पाहिलंत? मी मुळींच रागावलें नाहीं तुमच्यावर! ( शुष्क हंसून ) रागवायचा काय अधिकार आहे मला कुणावर!—पण सरदार! एक विनंति आहे, इच्छा आहे—भूक आहे माझी अखेरची! पुरी कराल?

**चंद्रकांत** : शक्य असली तर जरूर पुरी करीन!

**भिंगरी** : अधिकार म्हणून नाहीं, हक्क म्हणून नाहीं...पण भीक म्हणून ह्या अशक्त देहाची भूक आहे...मला जाण्यापूर्वी एकदांच जवळ घ्या. क्षणभर... पळभर!

**चंद्रकांत** : भिंगरी! [ सद्‌गदित होऊन तिला जवळ घेतो. ]—भिंगरी!!

**भिंगरी** : [ त्याला कवळ घालून केविलवाण्या आवाजानें ] छंदी मुसाफिरा! कां ह्या गरीबबापड्या पोरीच्या जिवाशीं खेळ खेळलास?

**चंद्रकांत** : क्षमा कर भिंगरी मला!–चुकलों मी!

**भिंगरी** : अगदीं भयंकर चूक केलीस ही राजा! भयंकर चूक केलीस! [ दूर होऊन ]—पण तुला मी दोष देत नाहीं! जा...स्वच्छंद पांखरा–उंच भरारी घेऊन दूर दूर उडून जा–पण—

**चंद्रकांत** : पण—

**भिंगरी** : कधीं काळीं ह्या दुर्दैवी मुलीची नुसती आठवण करीत जा–नुसती आठवण!!

[ रडत रडत आंत जाते.

[ दुसऱ्या बाजूनें चंद्रकांत व्याकळून निघून जातो.

[ पडदा उघडतो. पुढचें दृश्य

---

## अंक ३ रा — दृश्य अखेरचें

[ तीच रात्र—चंद्रकांतचे घर—चंद्रिका विमनस्क मनःस्थितींत फिरत आहे. ]

**चंद्रिका** : ( गाते )

**जाऊं कुठें रे तुजवीण आतां । सदया हे दीननाथा**
**ये धांव घे ये आतां ॥ ध्रु० ॥**
**आकाश फाटे धरणी दुभंगे । फुटतो वाटे माथा**
**ये धाव घे ये आतां ॥ १ ॥**
**शंकित झालें । भयभीत ठेलें । मानस माझें भांबावलेलें ॥**
**दिनरात ग्रासी चिंता ॥ २ ॥**
**ये ये प्रभो ये उद्धार द्याया । व्याकुळलें रे चिरशांति घ्याया**
**सांगूं कुणां मी मम वेदना या ।**
**शरणार्थी राया नत होई पाया ।**
**ये ये मम मुक्तिदाता । ये धांव घे ये त्राता ॥ ३ ॥**

[ दरवाजावर ठोठावणें ऐकूं येतें. चंद्रिका दरवाजा उघडते.

**प्रकाश** : [ आंत येऊन ] माफ करा वैनी ! बरीच रात्र झाली आहे. पण आल्याशिवाय राहवलं नाहीं, म्हणून मी आलों.

**चंद्रिका** : काय हवं तुम्हांला, प्रकाशभावोजी !

**प्रकाश** : मला ? काय हवं तें द्याल तुम्ही ?—भितां कशाला ? नाटकांतला खलनायक नाहीं मी चंद्रकांतांच्या; त्यांचा मित्र आहे !

**चंद्रिका** : पण ते आज घरीं नाहींत. तुम्ही अशा अवेळीं कसे आलांत ? तुम्हांला त्यांची भेट हवी असली तर ते थिएटरवर भेटूं शकतील आतां तुम्हांला !

**प्रकाश** : त्या थिएटरमध्यें त्यांना मी आतांच भेटून आलों. आनंदाची बातमी वैनी ! चंद्रकांतांनीं तमाशा कायमचा सोडला !

**चंद्रिका** : तमाशा सोडला ? कायमचा सोडला ? मग कुठं आहेत ते ? घरीं आले नाहींत ते अजून ?

**प्रकाश** : त्यांना मी सरळ घरींच घेऊन येत होतों. परोपरीनं त्यांची मीं समजूत केली. पति म्हणून त्यांचं कर्तव्य काय त्याची जाणीव करून दिली. पण...

**चंद्रिका** : पण ? ते आले नाहींत ?

**प्रकाश** : यायला निघाले होते. थिएटरमधून बाहेरही पडले. माझा आनंद गगनांत मावेना वैनी ! मीही त्यांच्या सोबतच इकडं यायला निघालों ! पण—

**चंद्रिका** : पण काय झालं भावोजी ? सारं सांगतां, आणि तेवढ्यापुरतंच मला घोटाळ्यांत कां ठेवतां ?

**प्रकाश** : पुढचं कसं सांगावं तें मला सुचत नाहीं वैनी ? पैशानं जिच्या शीलाचं मोल देतां येतं अशा एका नादान बाजारबसवीपुढं तुमच्यासारख्या प्रेमळ...तुमच्यासारख्या रूपगुणसंपन्न तरुण पत्नीची चंद्रकांतांना विस्मृति कशी पडूं शकते तेंच मला समजूं शकत नाहीं !

**चंद्रिका** : काय म्हणतां तुम्ही भावोजी ? अजून मला तुमचं कांहींच समजत नाहीं. इकडं यायला ते निघाले होते असं तुम्ही सांगतां, मग पुढं काय झालं तें कां सांगत नाहीं ? ते घरी कां आले नाहींत ?

**प्रकाश** : आम्ही यायला निघालों इतक्यांत पाठीमागून आवाज ऐकूं आला. कठोर, निश्चयी, आग्रही वाणी ऐकूं आली. 'चंद्रकांत–कुठं निघालांत ?' मागं वळून पाहिलं तर भिंगरी उभी दिसली !

**चंद्रिका** : भिंगरी ?

**प्रकाश** : सुंदर कांतीनं नटलेली, यौवनानं मुसमुसलेली–मोहमय—वांच्छनीय भिंगरी ! तिला बघतांच चंद्रकांतची अवस्था पाण्यांत पडलेल्या ढेकळासारखी झाली !

**चंद्रिका** : अरे देवा !

**प्रकाश** : 'भिंगरी !' असं आवेगानं म्हणून तो मागं वळला. ती नागीण पुढं झाली–आणि...!

**चंद्रिका** : आणि...?

**प्रकाश** : तिनं त्याला कडकडून आलिंगन दिलं ! 'राजा माझ्या !' असं म्हणून ती त्याच्या कवेंत कोसळली, आणि जाऊं नको अशी त्याला गळ घालूं लागली !

**चंद्रिका** : [ व्याकळून ] आणि हाच प्रकार सांगायला तुम्ही इथं आलांत कां भावोजी ? कशाला आलांत हा प्रकार सांगायला भावोजी ? मी आपल्या मरणानं इथं मरत आहे. इथं येऊन तुम्हीं माझ्या जखमेवर मीठ कां चोळलंत भावोजी ?

**प्रकाश** : जखमेवर मीठ ? नाहीं वैनी ! जखमेवर मीठ चोळण्याइतका निष्ठुर, निर्दय मला समजूं नका. मी जखमेवर मीठ चोळायला नव्हे, फुंकर घालायला आलों आहे !

**चंद्रिका** : आगीचा डोंब उसळला असतां नुसती फुंकर ती ज्वाला कशी विझवणार भावोजी ! माझं जीवन बरबाद झालं ! माझा संसार उध्वस्त झाला ! आतां मला सर्वत्र अंधार, अंधार दिसतो आहे !!

**प्रकाश** : अंधार उजळून काढणं हा प्रकाशाचा गुणधर्म आहे ! तुमच्यासारखी तरुण, तुमच्यासारखी सुंदर, तुमच्यासारखी गुणवान् स्त्री मातीमोल होत असलेली मी पाहात राहणार नाहीं ! मी तुमची मदत करीन ! तुम्हांला आश्रय देईन ! तुमचा सांभाळ करीन ! गुणी माणसांच्या गुणांचं चीज ह्या दुनियेंत कधीं होत नसतं ! पण गुणवती—चंद्रा—हा प्रकाश दुनियेसारखा नाहीं !

**चंद्रिका** : प्रकाश !—

**प्रकाश** : ह्या खुराड्यांत तुझ्यासारखी सौंदर्यवती शोभत नाहीं ! चल. . .बाहेर पड ह्या कोंदट वातावरणांतून—आपण दूर जाऊं—दूर. . .दूर. . .दूर जाऊं—

**चंद्रिका** : प्रकाश !—

[ चंद्रिकेचा नूर आतां पार पालटला आहे. ती आतां चंडिका बनली आहे

**प्रकाश** : पण—हें पाहा—

**चंद्रिका** : बाहेर हो काळसर्पा—बाहेर हो. . .बाहेर हो !!

[ प्रकाश निघून जातो : चंद्रिका दरवाजाशीं जाऊन उभी राहते. नंतर दरवाजा बंद करून घेऊन निराश होऊन परत येते.

**चंद्रिका** : [ स्वगत ] जाळयांत सांपडली म्हणून सिंहिणीला तिच्या जात कुळीचा विसर पडत नाहीं !

[ पुन्हां दरवाजावर थाप. कमरेला पदर खोंवून चवताळून ती आतां दरवाजाकडे धांवली आहे. खाडकन् आवाज करून तिनं दरवाजा उघडला आहे—आणि दारांत चंद्रकांत उभा आहे !

**चंद्रिका** : चालते व्हा इथून ! कशाला आलांत तुम्ही ? इथं कोण आहे तुमचं ? तुमची बायको होती ती मेली...ठार झाली...खलास झाली !! जा; जिथून आलांत तिथं परत जा. नाटकं करा...तमाशे करा...नाचा !

**चंद्रकांत** : माझ्या हेतूचा विपर्यासच होणार आहे का जन्मभर ! उपहासच लिहिला आहे का माझ्या भाळीं जिथं तिथं ?...काय चुकलं माझं ? मी कलाकार जन्मलों हा का माझा अपराध ? कलाकाराचा आत्मा माझ्यांत आहे ही काय माझी चूक ? अष्टौप्रहर, रात्रंदिवस माझ्या कलेला बोलकी करण्याची, प्रगट मांडण्याची इच्छा मला झाली ह्यांत चुकलं काय माझं ? नाटककारानं नाटक नाहीं करायचं—तर करायचं काय ?

**चंद्रिका** : तुम्ही नाटककार आहांत म्हणून नाटकं करतां तुम्ही ! घर, संसार, बायको ह्यांना साफ विसरून जाऊन कला बोलकी करतां; साकार करतां तुमची कला ! पण मी इथं सामान्य गृहिणी आहे ! मी इथं कुणाच्या जिवावर, कशाच्या आशेवर जगूं ? कशा करतां जगूं मी ? तुम्ही मोठे लेखक आहांत. मुक्या कष्टांना वाचा फोडून निराकाराला साकार करणारे एवढे मोठे कलावंत आहां म्हणून मला मोठ्या दिमाखानं सांगतां आहांत ! पण मीही माणूस आहे, हें ओळखून एकदां तरी माझ्या पातळीवर येऊन माझ्या भावनांचा विचार केलांत ? माझ्याही सहनशक्तीला आणि त्यागाला मर्यादा आहे ह्याची एकदां तरी जाणीव बाळगलीत ? तुम्ही माणूस आहांत...आणि मी माणूस नाहीं ? मला जगायचा अधिकार नाहीं ?

**चंद्रकांत** : अधिकार नाहीं असं मी म्हणालों नाहीं.

**चंद्रिका** : तसं तुम्ही म्हणाला नाहीं; पण मला हौसे-मौजेनं माणसासारखं जगतां यावं म्हणून नवरा ह्या नात्यानं आजवर काय केलं आहे तुम्हीं ?...हीं हीं माझ्या अंगावरचीं लक्तरं पाहिलींत ? फार तर देहाची लाज झांकली जात असेल त्यांनीं...पण माणूस म्हणून माझी हौस भागली जात नाहीं ह्या लक्तरांनीं ! ओल्या कोरड्या भाकरींनीं पोटाची आग शमवीत असेन मी; पण त्या तुकड्यांचे घास चघळतांना, मी माणूस आहे ह्या विचारासरशी उसळणारी आग शमत नाहीं उरांतली माझ्या !! काय सुख मिळालं तुमची पत्नी बनून मला ? तुमची पत्नी होण्यापेक्षां—!

**चंद्रकांत** :—चंद्रा ! बोलूं नकोस पुढचं ! नाहीं तर जन्मभर तुला पस्तावा होत राहील त्याबद्दल ! ! तुझं म्हणणं खरं आहे. मी थोर कलाकार असलों; तरी निर्धन, निष्कांचन, दरिद्री आहे—भारतासारख्या देशांत मी चुकून जन्मास आलों आहें ! आपल्या कलाकारांची कदर ह्या देशांत होत नाहीं. माझ्या कलेचं चीज ह्या देशांत होणार नाहीं. जीवंत आणि ज्वलंत कला मी देत आहे, पण तिचा मोबदला मला मिळूं शकत नाहीं—तुझी हौस मला भागवतां येत नाहीं... येणार नाहीं, हें जाणतों मी चंद्रा ! पण उपाशी असलों तरी समर्थ आहे मी... दरिद्री दिसलों तरी कुबेर आहे !! एक मधुर स्वप्न मी पाहात आहे. एक सुंदर नवी दुनिया जन्मास घालण्याची मधुर कल्पना मी जुळवीत आहे.—ह्या नव्या दुनियेचा प्रणेता—पिता मी असलों; तरी माता तूं आहेस—माझा गौरव हा तुझा गौरव आहे—माझा सन्मान आणि वैभव हें तुझं आहे चंद्रा !!

**चंद्रिका** : नाहीं ! फसवणूक आहे ही ! ही तुमची नवी दुनिया, नव्या जगाचं मधुर स्वप्न, प्रत्यक्षांत कधींच उतरणार नाहींत—तुम्ही स्वत: सुखी होणार नाहीं कीं इतरांना कांहीं देऊं शकणार नाहीं—तुम्ही कलाकार निःसंशय आहांत. सामर्थ्यही आहे तुमच्यांत...पण त्याची कोणीही कदर करणार नाही. मग त्यागाचा नुसता डांगोरा पिटण्यांत काय अर्थ आहे? उपासतापास सहन करण्यांत काय हंशील आहे? बुद्धी आहे ना तुम्हांला? मग स्वतःजवळचं रत्नभांडार मातीमोलानं डुकरांपुढं कां टाकतां? रत्नांचं मोल त्यांना कसं कळणार ?—त्यापेक्षां संसार करा; सुखी व्हा आणि मला सुखी करा !—ज्याला स्वतःचा संसार सांभाळतां येत नाहीं, तो जगाचा संसार काय कपाळ करणार? स्वतःचं घर सुधारूं शकत नाहीं तो राष्ट्र आणि देश काय सुधारणार ? जग काय बदलणार ?

**चंद्रकांत** : माझे पंखच असे तुटून पडल्यावर मी भरारी कशी मारूं ! माझे पायच असे लुळे झाले, मग मी प्रगति कशी करूं ? सारी दुनिया माझा उपहास करील; पण माझी चंद्रा अखेरपर्यंत मला साथ देईल...मला निष्ठ राहील असं मी समजत होतों. पण ती देखील अशी बोलूं लागली ! ती देखील माझा मार्ग अडवून अशी उभी राहिली !...आतां मात्र खरोखरच सारं संपलं !!

**चंद्रिका** : देवपण निघून गेल्यावर...

**चंद्रकांत** : नुसत्या दगडाला किंमत उरत नाहीं ! पुरें पुरें ! मला तूं दगड ठरवलेंस !...कारण सांगूं नको...माहीत आहे मला सारं. जाणतों मी कारण

तुझं !–तुझ्या प्रेमाचा, निष्ठेचा, भक्तिचा धिक्कार करून भिंगरीसारख्या बाईच्या नादाला मी लागलों आणि छंदाफंदांपायीं घर, संसार, सारं सारं विसरून गेलों असंच तुला म्हणायचं आहे; होय ना ?

**चंद्रिका** : माझं म्हणणं खोटं आहे असं सांगा ना—!

**चंद्रकांत** : खोटं आहे ! त्रिवार खोटं आहे ! मीच कशाला सांगूं तें–तुझ्या मनाला विचार. माझं मन फिरलं असेल; पण ह्या मनाभोंवतीं रात्रंदिवस भिरभिरणारं तुझं मन तर होतं तसं आहे ना ? मग अजून तूं मला ओळखूं शकत नाहींस का ? ज्या मनाशी तुझा इतका एक जीव झाला, कीं देह दोन पण आत्मा एक अशी आपली स्थिति आहे असं तूं एकदां नव्हें अनेकदां बोलून दाखवलंस...तें हें मन...तें हें माझं मन भिंगरीचं केवळ शरीरसौष्ठव बघून तिच्यासाठीं पागल झालं असं तुला खरोखर वाटलं होय चंद्रा ?

**चंद्रिका** : मला सोडून तिच्यासाठीं तुम्ही तमाशांत गेलांत !

**चंद्रकांत** : तुला सोडून ? पुष्पाला आपला परिमळ सोडतां येईल म्हणतेस ? चंद्राला आपलं चांदणं टाकून देतां येईल असं सांगतेस ? माझ्या जीवनांत तुझं स्थान काय आहे तें कुठल्या भाषेनं कुठल्या रसनेनं तुला मी सांगूं ?—भिंगरीविषयीं मला आकर्षण वाटलं...आपलेंपणा आणि जिव्हाळा वाटला–माझी कलाच साकाररूप घेऊन तिच्या देहानं उभी आहे असं मीं पाहिलं. पण भिंगरी माझ्या कलेचा देह मानला तर तूं चेतना आहेस...प्राण आहेस तूं त्या देहाचा !

**चंद्रिका** : मी ? मी तुमच्या कलेचा प्राण ?

**चंद्रकांत** : भिंगरी क्षणकाल टिकणारा सुंदर देह असला तर तूं अनंतकाल टिकणारा चिरंतन आत्मा आहेस–माझी प्रत्येक कलाकृति कुणाच्या प्रेरणेनं, कुठल्या स्फूर्तीनं जन्म पावली हें तुला सांगायला हवं ?...विश्वास बसणार नाहीं तुझा !...कारण आपण फार सुंदर नाहीं, बुद्धिमान नाहीं, कल्पक आणि चतुर नाहीं असा तुझा समज आहे ! आपल्या पतीची बुद्धीची भूक आपण भागवूं शकणार नाहीं असं तुला वाटत असतं—तुला ही चिंता रात्रंदिवस उगीचच बेचैन करून सोडीत असते...जाणतों मी सारं ! पण चंद्रा ! तुला कल्पनाही नाहीं, जगाला आपल्या कलेचं दर्शन घडवून क्षणमात्र...पळमात्र कां होईना नव्या जगांत घेऊन जाणारा हा चंद्रकांत दमून भागून परत येतों, तेव्हां तुझ्या

जवळ—तुझ्या कुशींत स्वतःचं दुःखानं, कष्टानं, क्लेशानं होरपळून गेलेलं जग विसरून नव्या जगांत स्वतः जगूं लागतों !

**चंद्रिका** : चंद्रकांत !

**चंद्रकांत** : बोलं ! चंद्रा बोल ! माझ्या अत्यंत विजयाच्या मंगल क्षणीं माझं सारं मोठेंपण विसरून आणि लहान मूल बनून तुझ्याभोवतीं मी आनंदानं नाचलों नाहीं ? माझ्या अत्यंत पराजयाच्या क्षणीं तुझ्या मांडीवर मस्तक टेकून मी हुंदके दे-देऊन रडलों नाहीं ?

**चंद्रिका** : आणि मी ? तुम्हांला नाचतांना पाहून मी नाचलें नाही ? तुम्हांला रडतांना पाहून मी रडलें नाहीं ? आजवर मीं तुम्हांला उत्तेजन दिलें नाहीं ? धीर दिला नाहीं ? आशा दिली नाही ?

**चंद्रकांत** : दिली ! त्याच आशेवर तर माझ्या ह्या अत्यंत आणीबाणीच्या क्षणीं मी पुन्हां ह्या माझ्या चेतनास्थानाकडे धांव घेतली आणि घरीं आलों. जीवनांत कधींही झाली नव्हती अशी निराशा आज माझी झाली आहे--चंद्रा ! फार मोठा पराजय झाला आहे आज माझा. आगीचा डोंब उसळला आहे ह्या माझ्या हृदयांत; तो शांत करायला आज मी तुझ्याकडे आलों आहे...वाटलं, लाख अपराध झाले तरी चंद्रा मला धीर देईल...मायेन बोलेल माझ्याशीं...जवळ घेईल; आणि तिच्या धीरानं पेटून उठून पुन्हां जगज्जेता वीर बनून नव्या तडफेनं मी जग जिंकायला बाहेर पडेन ! पण माझा अंदाज चुकला. स्वप्न भंग पावलं... माझी कल्पना, माझी प्रतिभा, माझी चेतना मला सोडून दूर उभी राहिली !– आतां दुनियेंत मी एकटा आहे !...तुला मी दोष देत नाहीं चंद्रा ! भाग्यानं तूं माझी पत्नी झालीस, पण माझ्या आत्म्याशीं एक आत्मा बनूं शकली नाहींस, माझ्या भावनेंत समरूप बनून सामावूं शकली नाहींस...तूं खरा चंद्रकांत ओळखूं शकली नाहींस !—ह्या अफाट जगांत मी आज एकटा एक जीव जगत आहे !! एकलेंपणा भयंकर आहे ! ह्या एकलेपणाचा मी आतां शेवट करून घेणार आहे !!

[ जायला निघतो

**चंद्रिका** : कुठं चाललांत चंद्रकांत ?

**चंद्रकांत** : मरायला ! ठार व्हायला ! ह्या एकाकी विचित्र जीवनाची अखेर करून घ्यायला !

**चंद्रिका** : मागं फिरा! चंद्रकांत! [ त्याला आवेगानें अडवून ] रागावलांत होय माझ्यावर? ह्या आपल्या वेड्या चंद्रावर रागावलांत? रागाच्या भरांत, निराशेच्या उद्वेगांत कांहीं तरी बडबडलें म्हणून सोडून जाणार तुम्ही मला! मला?–ह्या आपल्या चंद्राला?

**चंद्रकांत** : चंद्रा—!

[ मीलन!

[ मुरली येतो. बघतो. हंसतो. मागच्या मागें जातो ]

## अंक ३ रा समाप्त

